ॐ

रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी. वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ १२ वा

(अप्पयदीक्षितकृत)

# रामायणसारसंग्रह.

हा

(महाराष्ट्रतात्पर्यासह)

वेदमूर्ति मणूरमठाध्यक्ष

# मल्लिकार्जुनशास्त्री

यांनीं

सोलापूर येथें

श्री सिद्धेश्वर छापखान्यांत छापवून प्रसिद्ध केला.

---

आवृत्ति १ लीं—प्रति १०००.

शके १८२५—सन. १९०४.

---



---

किंमत ८ द.

# प्रस्तावना.

हें रामायणसारसंग्रह नांवाचें लहानसें गद्यपद्यात्मक काव्य विद्वान् अप्पयदीक्षित ह्यांनीं केलेलें आहे. अप्पयदीक्षित हे पहिल्याप्रतीचे शिवभक्त असल्यावद्दल त्यांची प्रसिद्धि आहे. रामायणांत ध्यावयासारखें काय आहे त्याचा संग्रह केला, ह्मणजे ह्या रामायणांत कोठें शिवाचें माहात्म्य श्रेष्ठ आहे एवढा तात्पर्यार्थ त्यांनीं काढिला आहे. ह्या ग्रंथ गद्यात्मक असून कवीनें आपल्या ह्मणण्यास वळकटी येण्यासाठीं त्यांस अनुकूल असे जागोजागचे रामायणांतील वेगवेगळे ठिकाणचे पद्यात्मक उतारे ह्यांत घेतले आहेत. सर्व रामायणांतील कथाभाग ज्यांस माहित नाहीं अशा लोकांस हा ग्रंथ प्रिय होणार नाहीं ही गोष्ट खरी आहे परंतु त्याला नाइलाज आहे. ज्याला रामायणांतील सर्व कथाभाग माहित आहे अशा शिवभक्तांनाच ह्या ग्रंथापासून उपयोग होईल. आमचा मुख्य उद्देश वीरशैव शैवमताचेच ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा आहे तरी इतर शिवोपासक शैव लोकांच्याही उपयोगी पडणारा हा ग्रंथ असल्यामुळें छापून प्रसिद्ध केला आहे. आणि सर्व लोकांस घेण्यास सोइवार पडावें ह्मणून ह्याची किम्मत मुद्दाम कमी ठेविली आहे. ह्यांत जे आंकडे घातले आहेत, ते केवळ गद्यावर किंवा पद्यावर घातले आहेत असें नाहीं; थोडा थोडा संदर्भ तितक्या तितक्या भागांत आला आहे असें दाखविण्याकरितां घातले आहेत. अप्पयदीक्षित हे विद्वान् असल्यामुळें त्यांनीं केलेला ग्रंथ चांगला आहेच हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं. त्यांनीं भारतसारसंग्रह ह्मणून लहानसा ग्रंथ करून त्यांत भारतांतील शिवोत्कर्षाची निवड केली आहे. आणि शिवाचें माहात्म्यच श्रेष्ठ आहे असें दाखविलें आहे. तो ग्रंथही लवकरच छापून प्रसिद्ध करण्याचा आमचा विचार आहे.

ह्या ग्रथाची छापील प्रत कानडी लिपींत असलेली मिळा-
ली, तिजवरून वे. शा. सं. रंगाचार्य सुधोळकर शास्त्री यांनीं
मराठींत तर्जुमा करून मराठी अर्थही त्यांनींच केला आहे

फक्त छापील प्रत एकच असून तिला ताडून पाहण्यास
ह्यावेळीं हस्तलिखित प्रत मिळाली नसल्यानें कानडी पुस्तकच व्यव-
स्थित रीतीनें छापलेलें आहे असें गृहीत धरणें भाग पडलें. त्या-
मुळें व हा कानडींतून मराठींत लिहून छापविण्याचा प्रथमच प्र-
यत्न असल्यामुळें, आमच्या नजरचुकीनें व गैरसमजुतीनें जे दो-
ष राहिले असतील ते कृपा करून कोणी आह्मांस कळवितील तर
त्यांचे आह्मी फार आभारी होऊन पुढील आवृत्तीच्यावेळीं त्यांचा
विचार करण्यास फार चांगली सोय होईल.

ह्या ग्रंथाचा मराठी अर्थ सुधारण्याचे आणि प्रुफें तपास-
ण्याचें कामीं रा. रा. कृष्णाजी नारायण जोशी शास्त्री ह्यांनीं म-
दत केल्याबद्दल आह्मी त्यांचे आभारी आहों.

ह्या ग्रंथाचा सर्वांनीं उपयोग करून घेतला ह्मणजे आह्मी
आमच्या श्रमाचें सार्थक्य झालें असें समजूं.

प्रसिद्धकर्ता.

## विनंति.

खालीं लिहिलेल्या वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती कोणाजवळ असल्यास त्यांनीं त्या आह्मांकडे अगर रा. सा. मल्लप्पा बसप्पा वारद यांचेकडे पाठवून देण्याची मेहेरबानी करावी, ह्मणजे धर्मग्रंथ छापण्याचे कामीं त्यांचा चांगला उपयोग होईल, व धर्मोन्नतीच्या कामीं त्यांनीं यथाशक्ति हातभार लावल्याचें त्यांस श्रेयही मिळेल, त्या ग्रंथाचें काम संपतांच त्यांची मूळप्रत परत करूं व दोन छापील प्रतीही देऊं. आपली मूळप्रत परत मिळेल किंवा नाहीं ह्याची शंका वाटल्यास, त्यांनीं आपली मूळप्रत परत मिळण्याविषयीं आपल्या इच्छेप्रमाणें खात्री पटवून घेऊन मग आमचेकडे ग्रंथ पाठवावे.

## अठ्ठावीस शैवागम.

| ग्रंथाचें नांव. | श्लोकसंख्या. | ग्रंथाचें नांव. | श्लोकसंख्या. |
|---|---|---|---|
| १ कामिकागम | १ परार्ध | १६ रौरवागम | १० कोटि. |
| २ योगजागम | १ लक्ष | १७ मुकुटागम | १ लक्ष |
| ३ चिंत्यागम | १ लक्ष | १८ विमलागम | ३ लक्ष |
| ४ कारणागम | १ कोटि | १९ चंद्रज्ञानागम | ३ कोटि |
| ५ अजितागम | १ लक्ष | २० बिंबागम | १ लक्ष |
| ६ दीप्तागम | १ लक्ष | २१ प्रोद्गीतागम | ३ लक्ष |
| ७ सूक्ष्मागम | १ पद्म | २२ ललितागम | ८ लक्ष |
| ८ सहस्रागम | १ शंख | २३ सिद्धागम | ५० लक्ष |
| ९ अंशुमानागम | १० लक्ष | २४ संतानागम | ६ लक्ष |
| १० सुप्रबोधागम | ३ कोटि | २५ सर्वोक्तागम | २ लक्ष |
| ११ विजयागम | ३ कोटि | २६ पारमेश्वरागम | १२ लक्ष |
| १२ निश्वासागम | १ कोटि | २७ किरणागम | ५ कोटि |
| १३ स्वायंभुवागम | ३ कोटि ५० ल. | २८ वातुलागम | १ लक्ष |
| १४ अनिलागम | ३ लक्ष | | |
| १५ वीरागम | १ लक्ष | | |

* यांपैकीं प्रत्येक आगमांतील श्लोकसंख्या वातुलागमांतून घेतली आहे.

## आगमांशिवाय इतर ग्रंथ.

१ श्रीरेणुकभाष्य.
२ श्रुतिसारभाष्य.
३ सोमनाथभाष्य.
४ सर्वेश्वरभाष्य.
५ चोळरेणुकभाष्य.
६ रेणुकचरित्र.
७ वीरमाहेश्वराचारसंग्रह.
८ वीरमाहेश्वराधिक्य.
९ वीरशैवाचारकौस्तुभ.
१० वीरशैवरत्नाकर.
११ वीरशैवप्रकाशिका.
१२ वीरशैवोत्कर्षप्रकाशिका.
१३ वीरशैवानंदचंद्रिका.
१४ वीरशैवप्रदीपिका (शिवज्ञान-शेखर.)
१५ शिवाद्वैतमंजरी.
१६ पंडितार्यचारित्र.
१७ मरुलसिद्धचारित्र.
१८ रेवणसिद्धचारित्र.
१९ क्रियासार.
२० कैवल्यसार.
२१ बसवराजीय.
२२ माचिदेवमनोविलास.
२३ वीरशैवचिंतामणि.
२४ शिवतत्वचिंतामणि.
२५ वीरशैवसंजीवनी.
२६ निराभारसंग्रह.
२७ षट्स्थलतिलक.
२८ प्रसंगरत्नाकर.
२९ षट्स्थलचंद्रिका.
३० शिवज्ञानप्रदीपिका.
३१ शांभवसार.
३२ शिवतत्वतर्कचंद्रिका.
३३ लिंगधारणचंद्रिका.
३४ शिवाद्वैतप्रदीपिका.
३५ सिद्धांतशेखर.
३६ विशेषार्थप्रकाशिका.
३७ अनादिवीरशैवसंग्रह.
३८ धर्मसंग्रह.
३९ शिवधर्मोत्तर.
४० वीरशैवमहोदधि.
४१ कथाडंबर.
४२ नंदीरहस्य.

ह्यांपैकीं कोणास ग्रंथ आमचे-कडे पाठविणें झाल्यास खालील पत्यावर पाठवावे.

वेदमूर्ति मणूरमठाध्यक्ष
मल्लिकार्जुन शास्त्री,
यांस वारदांचे येथें
सोलापूर.

# शुद्धिपत्रक.

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| ४ | २९ | पिडलेल्या | पीडलेल्या |
| ५ | ९ | देंवै | दैंवै |
| ,, | २४ | केल | केला. |
| ६ | २७ | शवाय | शिवाय |
| ११ | २० | ह्मणता | ह्मणतां |
| १२ | २ | दीक्षणा | दक्षिणा |
| १३ | ४ | महोवधौ | महोदधौ |
| १४ | २ | पूवं | पूर्वे |
| १४ | १६ | चौकोनीं | चौकोनी |
| १५ | ९ | स्सरून् | स्तरून् |
| १५ | २० | णू | णूं |
| १६ | २० | आहें | आहे |
| १९ | ४ | महोदधौ | महोवधौ |
| २१ | १४ | नाशन मिदं | नाशनमिदं |
| २३ | २१ | आयोध्येस | अयोध्येस |
| २६ | २ | मतंभागाना | मंत्रभागाना |
| २६ | १५ | आहित्यहृदय | आदित्यहृदय |
| ४४ | २७ | कबूल | कबूल |
| ४७ | ४ | पर्वापर | पूर्वापर |
| ६४ | १२ | प्रस्तूत | प्रस्तुत |
| ६४ | १९ | टाकिते | टाकितें |
| ६४ | २६ | गंचेच्या | गंगेच्या |

| | | | |
|---|---|---|---|
| ६६ | २३ | पुण्य | पुण्य— |
| ७० | ९ | वधाघादुपरतिं | वधादुपरतिं |
| ७२ | २७ | वाध्य बाधक | साध्य बाधक |
| ७४ | ३ | वर्यि | वीर्य |
| ७७ | २ | र्मिदं | मिदं |
| ७८ | २१ | शिबार्चे | शिवार्चे |
| ७९ | २० | मध्य वर्ति | मध्यवर्ति |
| ८० | ७ | समाचारितं | समाचरितं |
| ८० | १० | विद्या | विद्या |
| ८० | २३ | रितात | रिताव |
| ८१ | ९ | सागितलें | सांगितलें |

## ॥ श्रीशिवाय नमः ॥

अप्पयदीक्षितकृत

## ॥ रामायणसारसंग्रहस्तोत्रविवरणं प्रारभ्यते ॥

॥ १ ॥ इह खलु भगवान् प्राचेतसः कमलासनवरलब्ध-सकलार्थवेदनः श्रीरामचंद्रचरितवर्णनात्मकं श्रीरामायणाख्यं महदादिकाव्यं निर्ममे । तन्निर्माणश्च तत्र तत्र निबद्धैः श्रीरामचंद्रवचनैस्तच्चरितकाव्यांतरवचनैस्स्ववचनैश्च सकलदेवतातिशायिनं शिवस्य महिमातिशयं व्यंजयामासेसेतदर्थप्रतिपादकं शिवस्तोत्रमारभमाणस्तत्प्रतिपाद्यमर्थं तावत्प्रतिजानीते ॥ २ ॥ वाल्मीकिरादिकविराडखिलार्थदर्शी साक्षाद्विरिंच इव संप्रतिपन्न-

---

( १ ) श्री ब्रह्मदेवानें ज्याच्या तपश्चर्येला भुलून उत्तम वर देऊन सर्व शास्त्राच्या अर्थाचें ज्ञान ज्याला करून दिलें आहे, त्या पूज्य वाल्मीकि महर्षीनें श्री दाशरथिरामचंद्राच्या चरित्रानें परिपूर्ण असें रामायण नांवाचें जें महाकाव्य रचिलें, त्या काव्यांत कांहीं कांहीं ठिकाणीं रामाच्या भाषणांनीं युक्त जे श्लोक आढळतात, त्या श्लोकांनीं, आणि त्या रामाचेंच चरित्र ज्यांत आहे, अशा अन्य काव्यांतल्या श्लोकांनीं, शिवाय स्वतःच्या वचनांनीं सर्व देवांच्या माहात्म्यापेक्षां श्री शंकराचेंच माहात्म्य अधिक आहे, असें त्यांतल्या व्यंजक ( सूचक ) ( गर्भित अर्थ ज्यांत आहे अशा ) शद्बांनीं सिद्ध करून दाखविलें आहे, ह्मणून त्याच अर्थांनीं भरलेल्या “ शिवस्तोत्र ” नांवाच्या ग्रंथाला आरंभ करणाऱ्या अप्पय दीक्षितानें आपल्या ग्रंथाच्या आरंभीं मुख्य प्रतिपाद्यार्थ ( वर्णन करण्यास योग्य असा ईश्वर [ शिव ] ह्मणून ) सांगितला; तो असा. ( २ ) ( पुढचा श्लोक शंकराला उद्देशून आहे ) हे विश्वेश, शंकरा, ज्याला जगांतलीं सर्व तत्वें समजल्यामुळेंच कीं काय जणूं दुसरा ब्रह्मदेवच जो दिसतो, अर्थात्

भावः । विश्वेशविष्णुमधिकृत्य कृते प्रबंधे व्यक्त्या तवैव निबबंध परं परत्वम् ॥ १ ॥ ( व्या० ) व्यक्त्या व्यंजनाख्यया ध्वनिवृत्त्या ॥ ३ ॥ तत्र तावदगस्त्याश्रमप्रवेशसमये श्रीरामचंद्रवचनैः कविवचनैश्च शिवमहिमातिशयद्योतनमाविष्करोति रामायणे हि ॥ ४ ॥ कलशप्रभवाश्रमस्था देवादयोऽपि तमुपासत इत्युदीर्य " स्थानानि चात्र मधुजिन्मघवन्मुखानां तस्याश्रमे निगदितानि न ते कपर्दिन् " ॥ ५ ॥ अगस्त्याश्रमाभ्याशे लक्ष्मणं प्रति श्रीरामचंद्रवचनानि ॥ ६ ॥ " अत्र देवाः सगंधर्वाः सिद्धाश्च परमर्षयः । अगस्त्यं नियताहारं सततं पर्युपासते ॥ ७ ॥ अत्र देवाश्च यक्षाश्च नागाश्च पतगैः सह ॥

---

ज्याला सर्व शास्त्राचें ज्ञान झालें आहे, अशा आदिकविश्रेष्ठ वाल्मीकीनें विष्णूला नायक करून जो प्रबंध केला, त्यांत तुझेंच सर्वोत्कृष्टत्व व्यंजकशब्दांनीं वर्णन केलें आहे. ( आतां रामयणांतल्या कांहीं वेंचक वाक्यांनीं शिवसर्वोत्कृष्टत्व सिद्ध करण्यास आरंभ करतात ) ( ३ ) त्यांत प्रथमतः रामायणांत श्रीरामानें अगस्त्यऋषीच्या आश्रमांत प्रवेश केला, असें वर्णन जें केलें आहे त्यावेळीं श्रीरामाचें जें भाषण झालें, आणि कवीचीं वाक्यें जीं काय आहेत त्या सर्व वचनांनीं शिवाचाच महिमा मोठा आहे असें प्रस्तुतसमयीं सिद्ध करून दाखवितों. ( ४ ) हे शंकरा, देवादिकांनीं सुद्धां अगस्त्याच्या आश्रमांत राहून अगस्त्याची उपासना केली असें सांगून विष्णु, इंद्र इत्यादि देवांचीं स्थानें सुद्धां त्या आश्रमांत आहेत, असें सांगितलें आहे, परंतु तुझ्या स्थानाचें वर्णन मात्र कोठें आढळत नाहीं. ( ५ ) आणि अगस्त्य ऋषीच्या आश्रमाजवळ श्रीरामानें लक्ष्मणास असें सांगितलें कीं, ( ६ ) हे लक्ष्मणा, या आश्रमांत देव, गंधर्व, सिद्ध, श्रेष्ठ श्रेष्ठ ऋषि वगैरे सर्व लोक सतत महातपस्वी अगस्त्याची सेवा करितात. ( ७ ) शिवाय या आश्रमांत देव,

वसंति नियताहारा धर्ममाराधयिष्णवः" इति ॥ ८ ॥ अगस्त्या-श्रमप्रवेशानंतरम् कविवचनानि। "न तत्र ब्रह्मणस्स्थानमग्ने-स्स्थानं तथैव च। विष्णोस्स्थानं तथेंद्रस्य स्थानं चैव विवस्वतः ॥ ९ ॥ सोमस्थानं भगस्थानं स्थानं कौबेरमेव च। धातु-र्विधातुः स्थाने च वायोस्स्थानं तथैव च ॥ १० ॥ स्थानं च पा-शहस्तस्य वरुणस्य महात्मनः। स्थानं तथैव गायत्र्या वसूनां स्थानमेव च ॥ ११ ॥ स्थानं च नागराजस्य त्वनंतस्य महा-त्मनः। कार्तिकेयस्य च स्थानं धर्मस्थानं च पश्यति" इति ॥ १२ ॥ एवं "देवादयोऽपि तमुपासत" इति वचनानां स्थानवर्णनवच-नानां च वक्तृभेदेऽपि काव्यप्रबंधुरेकत्वादुदीर्येति निर्देशः ॥१३॥

---

नाग, यक्ष, पक्षी, इत्यादि प्राणी सुद्धां बेतानें आहार घेऊन धर्माची आराधना करितात. (असें हें रामाचें वाक्य झालें) (आतां क-वीचें वाक्य सांगतात.) अगस्त्यऋषीच्या आश्रमांत श्रीरामानें प्रवेश केल्यानंतर कवी वाल्मीकि असें ह्मणतो कीं, (८) या आश्रमांत ब्रह्मदेवाचें स्थान, अग्नीचें स्थान, विष्णूचें स्थान, इंद्राचें स्थान, यमाचें स्थान, (९) चंद्राचें स्थान, भग नांवाच्या देवाचें स्थान, कुबेराचें, धात्याचें, विधात्याचें, वायूचें, (१०) तसेंच पाश ज्याच्या हातांत आहे अशा वरुणाचें, गायित्रीचें, अष्टवसूंचें, (११) नागराजाचें, महात्मा अशा अनंताचें, षण्मुखाचें आणि धर्माचें अशीं सर्व दे-वांचीं स्थानें दिसतात, परंतु शंकराचें स्थान नाहीं. (१२) येथें कोणी एक शंकाकार ह्मणतो कीं, "देवादिक अगस्त्याची उपसना करीत होते" हें असें वचन आणि स्थानवर्णनाचें वचन हीं दोन्हीं वचनें भिन्न अर्थाचीं असून "उदीर्य" (असें सांगून असेंही सां-गितलें) शद्वाचा प्रयोग कसा केला? या प्रश्नाला उत्तर देतात कीं, वचनें भिन्न अर्थाचीं असलीं तरी प्रस्तुत काव्य रचणारा कर्ता एकच असल्यामुळें "उदीर्य" असा प्रयोग केला. (१३) असो; येथें

अत्र ब्रह्मादीनामगस्त्यमुपासितुमागतानां स्थानान्युक्तानि तथैव प्रागुपक्रांतत्वात् उत्तररामायणे शंबुकवधानंतरं श्रीरामचंद्रं द्रष्टुं स्वर्गाद्विमानैरागतानां "अगस्त्यस्याश्रमपदं द्रक्ष्यामस्तं महाशयं" इत्यादिकं वचनजातमुपन्यस्य तथैव तदभिवादनार्थं तेषामगस्त्याश्रमगमनोक्त्या तत्रैव श्वेतनामानं राजानं क्षुत्पिपासारूपमहाव्याधेरवधिं पृष्टवंतं प्रति अगस्त्यदर्शनेन ॥ १४ ॥ "न हि तारयितुं शक्तः सौम्यः सुरगणानपि । किं पुनस्त्वं महाबाहो क्षुत्पिपासासमन्वितं" ॥ १५ ॥ इति वचनोपन्यासेन च अगस्त्यस्य सकलदेवतोपास्यतायाः स्फुटीकरणाच्च ॥ १६ ॥

---

ब्रह्मादि देवांचीं स्थानें असून त्यांनीं आपापल्या स्थानांत राहून अगस्त्याची उपासना केली, असें वर्णन करून पुढें उत्तररामायणांत असें वर्णन केलें कीं, शंबुकाला मारल्यानंतर श्रीरामचंद्राचें दर्शन घेण्याकरितां विमानांत बसून स्वर्गाहून आलेल्या देवांची इच्छा महानुभाव अगस्त्याला पाहण्याची झाली. अशा अर्थाचें "अगस्त्यस्याश्रमपदं द्रक्ष्यामस्तं महाशयम्" हें वाक्य सांगून तसेंच अगस्त्य महर्षीला नमस्कार करण्याकरितां सर्व देव गेले. या उक्तीनें आणि तेथेंच त्याच वेळेला श्वेत नांवाचा कोणी एक राजा येऊन त्या राजानें अगस्त्यऋषीचें दर्शन घेऊन त्या ऋषीला भूक तहान रूपी मोठ्या रोगाची सीमा कोठपर्यंत आहे, असा प्रश्न केला. त्यावेळेस अगस्त्यऋषीनें उत्तर दिलें कीं, ॥ १४ ॥ हे बाहुशाली राजा, भूक व तहान ज्यांस लागत नाहीं कांतर जे अमृत पिऊन तृप्त असतात, ते देव निरंतर माझी उपासना करितात, अशा देवांना रक्षण करण्यास मी समर्थ नाहीं, मग क्षुधा तृषारूपी महारोगानें पिडलेल्यांचे मी रक्षण करितों, ह्मणून कसें सांगूं? ॥ १५ ॥ अशा अर्थाच्या अगस्त्याच्या वचनानें सर्व देव अगस्त्यऋषीला भजत होते असें स्पष्टपणें सिद्ध झालें. ॥ १६ ॥

अगस्त्योपासनार्थं तदाश्रमे निवसतां ब्रह्मादिदेवानामिव तत्र शिवस्य स्थानं नोक्तं । तस्माद्ब्रह्मविष्ण्वादय एव अगस्त्योपासकाः न तु शिव इति द्योतनेन शिवस्य तदतिशायिमहिमा व्यंजितः ॥ १७ ॥ न केवलमेतावता किंतु प्रकारांतरेणापि व्यंजित इत्याह ॥ वृ० ॥ तेन त्वमेव ननु सिध्यसि पारिशेष्यात्तस्येंदुशेखर तपोनिकरैरुपास्यः । तस्याप्युपासकतया विनिवेशितेभ्यस्तेभ्यस्तव त्वतितरां महिमा प्रसिध्येत् ॥ १८ ॥ शिवं विना सकलैर्देवैरुपास्यमानस्य ह्यगस्त्यस्य तपोनिकरैराराधनीयः शिव एवेति पारिशेष्यात्सिध्यति । ततश्च इतरदेवानां शिवोपासकत्वसिद्धेस्तेभ्यः शिवस्यातितरामुत्कर्षः प्रसिध्यतीत्यर्थः ॥ १९ ॥ किंच लवणवधार्थं शत्रुघ्नं प्रेषयता श्रीरामचंद्रेण तद्वधार्थं हरि-

---

तसेंच अगस्त्याच्या उपासनेकरितां राहिलेल्या ब्रह्मादि देवादिकांचीं स्थानें जशीं सांगितलीं, तद्वत् ईश्वराचें स्थान सांगितलें नाहीं. अर्थात् ब्रह्मा विष्णू इत्यादि देवच अगस्त्याचे उपासक होत. शंकर कांहीं नाहीं असें सिद्ध झाल्यामुळें सर्व देवांदिकांपेक्षां शिवाचा महिमा मोठा आहे असा यांतून ध्वनि निघतो ( १७ ) केवळ इतक्यानेंच शिवसर्वोत्कृष्टत्व सिद्ध झालें असें कांहीं नाहीं, आणखीही दुसऱ्या कांहीं प्रमाणांनीं तें सिद्ध करून दाखवितों हे शंकरा, तुझ्या व्यतिरिक्त इतर सर्व देव अगस्त्यऋषीच्या सेवेंत तत्पर होते, अशा या देवादिकांच्या वर्तनावरून सर्व देवांपेक्षां तुझेंच माहात्म्य श्रेष्ठ आहे, असें सिद्ध होतें. ( १८ ) दुसरें असें कीं, सगळे देव ज्याची उपासना करीत होते तर स्वतः तो अगस्त्यमुनि कोणत्या देवाला उद्देशून तप करीत होता ? याचा विचार केला असतां परिशिष्ट न्यायानें आपल्याला [ शिवाला ] उद्देशून तो तप करीत होता ह्मणून व्यक्त होत नाहीं काय ? ( १९ ) आणखी सांगतों कीं, श्रीरामचंद्रानें लवणासुराच्या संहाराकरितां ह्मणून शत्रुघ्नाच्या ह-

मूर्तिरूपं किंचिदस्त्रं दत्वा तत्प्रभावो वर्णितः ॥ २० ॥ " नायं मया शरः पूर्वं रावणस्य वधार्थिना । मुक्तः शत्रुघ्न भूतानां महांस्त्रासो भविष्यति" इति ॥ २१ ॥ तथैव शत्रुघ्नेन क्रियमाणे तस्य शरस्य संधाने सकलभूतत्रासकत्वात्त्रासेन समागतान् देवान् प्रति ब्रह्मणो वचनेनापि तस्य शरस्य महामहिमा प्रपंचितः ॥ २२ ॥ " एषो हि पूर्वदेवस्य लोककर्तुः सनातनः । शरस्तेजोमयोह्येष येन वो भयमागतम् ॥ २३ ॥ एष वै कैटभस्यार्थे मधुनश्च महाशरः । सृष्टो महात्मना तेन वधार्थं दैत्ययोस्तयोः ॥ २४ ॥ एवमेव प्रजानीध्वं विष्णोस्तेजोमयं श-

---

तांत विष्णुमय असें एक वैष्णव अस्त्र देऊन त्या अस्त्राचा प्रभाव ही सांगितला कीं, ( २० ) बाबा शत्रुघ्ना, पूर्वीं म्यां रावणाला मारावयाच्या वेळेस सुद्धां हें अस्त्र सोडिलें नाहीं. याचें कारण असें आहे कीं, या अस्त्रापासून इतर प्राण्यांना सुद्धां विनाकारण त्रास होतो, ह्मणून अशा उग्र अस्त्राचा त्या वेळेस उपयोग केला नाहीं. अतएव या वेळेस तूं सुद्धां समय पाहून वाग, असें सांगून रामानें शत्रुघ्नाला पाठविलें. ( २१ ) नंतर लवणासुराला मारण्याकरितां गेलेल्या शत्रुघ्नानें त्याच अस्त्राचा उपयोग जेव्हां केला, तेव्हां सगळ्या देवांना त्रास होऊन ब्रह्मदेवाजवळ सर्व देव आले, त्यांना पाहून ब्रह्मदेवानें सुद्धां त्या अस्त्राचा प्रभाव सांगितला. तो असा. ( २२ ) देवहो, ज्याच्या भीतीमुळें तुह्मी येथें आलां, तो बाण साक्षात् सर्व जगाचा जो कर्ता ह्मणवितो, त्या महात्म्या विष्णूचा आहे. या अस्त्राचा पूर्वींचा इतिहास असा आहे कीं, ( २३ ) मधुकैटभ नांवाचे दोघे दैत्य जेव्हां विनाकारण जगास छळूं लागले, तेव्हां महाविष्णूनें त्यांना मारण्याकरितां या अस्त्राची योजना केली. याप्रमाणें तुह्मी समजा. ( २४ ) शिवाय हें अस्त्र ह्मणजे केवळ विष्णूचें तेजच आहे, किंवा वि-

रम्। एषा दैवतनुः पूर्वं विष्णोस्तस्य महात्मनः ” इति ॥ २५ ॥ एवंभूतं शरं प्रयच्छतापि श्रीरामचंद्रेण यदा शिवेन स्वशूलाद्विनिष्कृष्य दत्तं शूलं लवणस्य हस्ते स्थितं तदा येन केनाप्युपायेन स जेतुं न शक्य इति हस्ते शूलाभावसमये संनिरुध्य अनेन शरेण संहंतव्य इत्युपदिश्य तदुपपादनार्थमुक्तं ॥ २६ ॥ “ श्रीमतः शितिकंठस्य कृत्सं हि दुरतिक्रमं ” इति ॥ २७ ॥ अनेनापि शिवस्य निरतिशयोत्कर्षसिद्धिमाह । अत्यंतपूज्यविषयं किल यत्प्रसिद्धं श्रीमद्विशेषणमिदं हरिमूर्तिरूपाव । अस्त्रात्त्वदाप्तमधिकं किमपि त्रिशूलं व्यक्तं त्वयीव न परत्र

---

ष्णूचा साक्षात् देहच आहे असें समजा. ( २५ ) असो. अशा सामर्थ्याचा बाण जेव्हां रामानें शत्रुघ्नाच्या हातांत दिला त्याच वेळेस दुसरा उपदेश असा केला, की शत्रुघ्ना, शंकरानें त्या दैत्याला आपलें शूल नांवाचें एक अस्त्र दिलें आहे. तर ज्या वेळेस त्या दैत्याच्या हातांत तो शूल नसेल ती वेळ साधून या बाणाचा उपयोग करून त्याला मार.कारण असें कीं, त्याच्या हातांत जेव्हां जेव्हा शूल असेल तेव्हां तेव्हां तो दैत्य तुला अजिंक्य आहे असें समज. असा उपदेश करून पुनः शिवाचें वर्णनही याप्रमाणें केलें. ( २६ ) शत्रुघ्ना, नीलकंठाचें माहात्म्य फार मोठें आहे. आणि त्या शंकराची कृति मोठी अगाध आहे, याकरितां दैत्याच्या हातांत शूल नसतां या बाणाचा उपयोग कर. ( असें हें रामाचें वाक्य घेऊन ग्रंथकार ह्मणतो ) ( २७ ) या रामाच्या वचनानेंही शिवाचें माहात्म्यच श्रेष्ठ आहे, असें सिद्ध करितों. हे शंकरा, आपल्याला श्रीरामचंद्रानें आपण स्वतःच जगांत पूज्य असल्यामुळें आपणास श्रीमत् असें विशेषण दिलें आहे, तेव्हां तुमच्यापासून मिळालेलें अस्त्र दुसऱ्या प्राण्याजवळ जरी असलें तरी तें महाविष्णूसारख्याच्या प्रबळ अस्त्रासही अजिंक्य ( जिंकण्यास अशक्य ) आहे, ( २८ )

निवेशितं तव ॥ २८ ॥ वैष्णवमूर्तिरूपेणाप्यस्त्रेण हरदत्तशू-लाभावसमयं प्रतीक्ष्य हंतव्य इति वचनेन तदुपपादनार्थेन शि-वाज्ञाया दुरतिक्रमत्ववचनेन च शिवस्य निरतिशयमहिमा स्पष्ट एव "श्रीमद्विशेषणेनापि तदभिव्यक्तिरुच्यते" अत्र हीदं विशेषणं 'श्रीमांच्छत्रुनिवर्हणः' "षडर्धनयनः श्रीमान्" इत्यादाविव कांस-तिशयादिवर्णनेन नान्यथा सिद्धं। ततो दुरतिक्रमत्वोपपादनासि-द्धेः ॥ २९ ॥ किंत्वसंतपूज्यविषयं इत्थंभूतमिदं विशेषणं शिव इव नान्यत्र प्रयुक्तमिति तेनापि तस्य निरतिशयोत्कर्षसिद्धिः ॥ ३० ॥ कुंभोद्भवस्य सुरसंसदुपास्यता च श्रीमद्विशेषणमिदं च तवेंदुमौले । श्रीरामचंद्रवचनेष्विति तन्निबंधस्तस्यापि भ-

---

आणखी शंकरानें दिलेला त्रिशूल जेव्हां त्या दैत्याच्या हातांत नसेल अशी संधि साधून वैष्णव अस्त्रानें त्यास मारावें अशा अर्थाच्या रामाच्या वचनानें, शिवाय शिवाची आज्ञा मोडण्यास फार अशक्य आहे, या वचनानें सुद्धां शिवाचें महत्व फार आहे असें स्पष्टपणें सिद्ध झालें. तसेंच "श्रीमत्" या विशेषणानें ही शिवाचें माहात्म्य अधिक आहे, असें दाखवितों. "श्रीमांन्छत्रु निवर्हणः। षडर्धनयनः श्रीमान्" इत्यादि ठिकाणीं शंकराच्या कांतीचें वर्णन जरी केलें आहे, तरी अन्यथा कांहीं होत नाहीं. कारण शंकराच्या कांतीपेक्षां जगांत दुसऱ्या कोणाचीही कांति अधिक नाहीं ह्मणून (२९) तसेंच "अत्यंतपूज्यविषयं" हें विशेषण शिवाला जसें दिलें आहे, तद्वत् दुसऱ्याच्या ठिकाणीं अशा विशेषणाचा प्रयोग केला नाहीं, यावरून शिवाच्या माहात्म्या पलीकडे दुसऱ्याचें माहात्म्य नाहीं असें सिद्ध झालें. (३०) आतां पुनः ग्रंथकार ह्मणतो कीं, हे चंद्र-मौले शंकरा, श्रीरामानें अगस्त्यऋषि हा सर्व देवांचा उपास्य (सेवा करण्यास योग्य) आहे असें सांगितल्यामुळें आणि तुझांला श्रीमत् असें विशेषण दिल्यामुळें श्रीरामचंद्राचीही आपल्याविषयीं

क्तिमधिकां भवति व्यनक्ति ॥ ३१ ॥ अथ श्रीरामचंद्रवचनांतरेणापि तस्य शिवे भक्त्यतिशयव्यक्तिं दर्शयति ॥ ३२ ॥ यस्यास्ति हि स्म शिबिरं शिवदक्षिणाग्रे कुक्षिंगते जलनिधेर्नलसेतुक्लृप्त्यै । तस्मिन् जगद्विदितभूमनि सेतुबंधे पूर्वं प्रसन्न प्रति च त्वयि भक्तिमूचे ॥ ३३ ॥ प्रतिप्रयाणसमये सीतां इति श्रीरामचंद्रवचनानि ॥ ३४ ॥ "एतत्तु दृश्यते तीर्थं सागरस्य वरानने । यत्र सागरमुत्तीर्य तां रात्रिमुषिता वयम् ॥ ३५ ॥ एष सेतुर्मया बद्धः सागरे सलिलार्णवे । तव हेतोर्विशालाक्षि नलसेतुः सुदुष्करः ॥ ३६ ॥ पश्य सागरमक्षोभ्यं वैदेहि वरुणालयम् । अपारमभिगर्जंतं शंखशुक्तिनिषेवि-

---

पूज्यबुद्धि व्यक्त [ उघड ] होते. ( ३१ ) आतां श्रीरामचंद्राच्या दुसऱ्या वचनानें सुद्धां शिवाचे ठिकाणीं त्याची अतिशय भक्ति होती, असें दाखवितों. ( ३२ ) हे शंकरा, श्रीरामचंद्रानें नलसेतु बांधण्याकरितां समुद्राच्या एका बाजूला असलेल्या आपल्या स्थानाच्या उजव्या बाजूस आपलें सैन्य ठेविलें. नंतर त्या सर्वज्ञ रामानें पूल बांधतानां असें ह्मटलें कीं, यापूर्वीं शंकर मला प्रसन्न झाले आहेत, यावरून हे ईश्वरा, तुमच्या ठिकाणीं रामानें आपली भक्ति दाखविल्याप्रमाणें होत नाहीं काय ? "तसेंच लंकेहून परत निघतांना रामानें सीतेला सांगितलेलें वाक्य" ( ३४ ) हे सुंदरी सीते, येथें जें समुद्राचें तीर्थ दिसत आहे, याठिकाणीं आह्मी समुद्र तरून ज्यादिवशीं आलों, त्यादिवशीं सबंध रात्र घालविली. ( ३५ ) हे विशालाक्षि इकडे पाहा. तुझ्याकरितां हा परम दुष्कर [ दुसऱ्यास करण्यास अशक्य ] नलनांवाचा मोठा सेतु समुद्राच्या पाण्यांत आह्मी बांधिला. ( ३६ ) हे सीते, हा समुद्र पहा. हे जानकी, ज्याच्या पाण्यांत वरुणाचें सुंदर घर आहे,

तम् ॥ ३७ ॥ हिरण्यनाभं शैलेंद्रं कांचनं पश्य मैथिलि । वि-श्रमार्थं हनुमतो भित्वा सागरमुत्थितम् ॥ ३८ ॥ एतत्कुक्षौ समुद्रस्य स्कंधावारनिवेशनम् । एतत्तु दृश्यते तीर्थं सागरस्य महात्मनः ॥ ३९ ॥ सेतुबंध इति ख्यातं त्रैलोक्येनाभिपूजितम् । एतत्पवित्रमतुलं महापातकनाशनम् ॥ ४० ॥ अत्र पूर्वं महादेवः प्रसादमकरोत्प्रभुः । अत्र राक्षसराजोयमाजगाम विभीषणः" इति ॥ ४१ ॥ अत्राद्यश्लोकेन सागरतरणानंतरं यत्र परपारे समुद्रजलावतारप्रदेशे सेनानिवेश आसीत् स प्रदेश उक्तः ततस्त्रिभिः श्लोकैः स्वकारितो नलसेतुः सागरो

---

आणि ज्याच्या पोटांत कोट्यावधि शंख, शिंपी व मोत्यें आहेत, असा हा समुद्र अपरंपार असून कसा गर्जना करितो पहा. ( ३७ ) हे जानकी, इकडे पहा, हा जो पर्वत समोर दिसतो, तो सर्वतोपरी सोन्याचा असून याचें नांव हिरण्यनाभ [मैनाक] असें आहे. अगे जानकी, पूर्वी मारुती जेव्हां तुझ्या शोधाकरितां इकडे आला होता, तेव्हां त्या मारुतीच्या विश्रांतिकरितां हाच पर्वत समुद्रांत बुडालेला असूनही पाणी दुभंग करून वर आला. ( ३८ ) आणखी हे पहा, ही जी समुद्राची बाजू दिसते, येथेंच आमच्या सैन्यानें तळ दिला होता. त्याच्या जवळच महात्म्या समुद्राचें तीर्थ दिसतें पहा. ( ३९ ) या तीर्थाला सेतुबंधतीर्थ असें नांव आहे. आणि या तीर्थाची पूजा सगळें जग करितें. शिवाय हें तीर्थ परम पवित्र असल्यामुळें येथें स्नान केल्यानें मोठमोठीं सर्व पातकें नष्ट होतात. (४०)हे जानकी, येथेंच पूर्वी माझ्यावर शंकरानें अनुग्रह केला. शिवाय येथेंच राक्षसश्रेष्ठ बिभीषण येऊन त्यानें माझ्याशीं सख्य केलें. असो ( ४१ ) येथें रामानें समुद्रतरण केल्यानंतर सैन्यानें ज्या ठिकाणीं तळ दिला होता, तो प्रदेश पुढच्या श्लोकानें सांगितला, त्यानंतर स्वतः आपण उभा राहून करविलेला नलसेतु, समुद्र व मैनाक असे

मैनाकश्च प्रदर्शितः । तदनंतरमर्धेन यत्र नलसेतुबंधनार्थं सेनानिवेश आसीत् स प्रदेश उक्तः । न च तेन मैनाक एव लंकावत्समुद्रमध्यगतदुर्गरूप उक्त इति शंकनीयम् । समुद्रमध्ये निमज्य स्थितस्य तस्य प्राग्दुर्गत्वोक्त्ययोगात् अनंतरमपि केनचित्तमेव दुर्गमाश्रित्य स्थीयत इति प्रसिध्यभावात् दुर्गं कर्तुं शक्यमित्यर्थकल्पनस्य चातिक्लिष्टत्वात् " यत्र सागरमुत्तीर्य तां रात्रिमुषिता वयं " इति सागरोत्तरणानंतरस्यैव तत्प्राचीनस्यापि स्कंधावारनिवेशनस्यैव प्रदर्शने तत्स्वारस्याच्च ॥ ४२ ॥ एवं च तस्य समुद्र-

---

तीन पदार्थांचें तीन श्लोकांनीं वर्णन केलें. नंतर पुनः सेतु बांधण्याकरितां ज्याठिकाणीं सेनेचा तळ दिला होता, त्याप्रदेशाचें वर्णन अर्ध्या श्लोकानें केलें आहे. तें असो, परंतु आह्मांला थोडी या प्रकरणांत शंका येते असें कोणीएक शंकाकार ह्मणेल, ती शंका अशी कीं, समुद्राच्या मध्यभागीं जो मैनाक पर्वत दिसला, तो पर्वत समुद्राच्या मध्यभागीं असून लंकेप्रमाणेंच एक किल्लाच होता असें कां ह्मणूं नये? तर, समुद्रांत जेव्हां तो पर्वत बुडालेला होता तेव्हां किल्ला नव्हता असें सिद्ध झाल्यामुळें तो पर्वत किल्याच्या रूपानें होता, असें ह्मणतां येत नाहीं. बरें पर्वत समुद्रांतून वर आल्यानंतर तो किल्याच्या रूपानें राहिला असें कां ह्मणूं नये? तर अशी प्रसिद्धि जगांत नाहीं, ह्मणून तसेंही ह्मणता येत नाहीं. शिवाय किल्ला करण्यास योग्य आहे, अशी कल्पना केली तरी ती कल्पना फार क्लिष्ट असल्यामुळें तसें ह्मणूंच नये. शिवाय " ज्या ठिकाणीं समुद्र तरून ती रात्र घालविली, तो हा प्रदेश " अशा या रामाच्या भाषणानें समुद्र तरून जाण्याच्या अगोदर रामाची सेना त्या ठिकाणीं होती असें दाखविल्यानें विशेष एक प्रकारचा रस निघतो, म्हणून मैनाक हा किल्याच्या रूपानें होता असें म्हणूं नये. ( ४२ ) यावरून रामाचें सैन्य समुद्राच्या

कुक्षिगतत्वोक्तिः सेतुबंधाख्यवक्ष्यमाणसेतुदक्षिणाग्रप्रदेशत्वाभिप्रायेण योजनीया। अन्यथा समुद्रजलमध्ये यावन्नलसेतुबंधनं पंचरात्रपर्यंतं सेनानिवेशायोगात् ॥ ४३ ॥ ततः सार्धश्लोकेन सेतुबंधाख्यः सकलजगत्पूजितः सकलमहापातकनिवर्तकश्च सेतुरुक्तः तस्य सेतोस्तथाभूतमहिमहेतुस्तत्र रामेण प्रतिष्ठापितस्य तथा वरं दत्तवतः शिवस्य प्रसादस्तदनंतरमर्धेनोक्तस्तेनार्धेन संक्षिप्तश्चार्थः ॥ ४४ ॥ कूर्मपुराणे रामायणोपाख्याने रावणवधानंतरं प्रतिप्रयाणवृत्तांतकथने विवृतः ॥ ४५ ॥ "सेतुमध्ये महादेवमीशानं कृत्तिवाससम्। सामिसोमलसत्फालं स्थापयामास राघवः ॥ ४६ ॥ तस्य देवो महादेवः पार्वत्या सह शंकरः। प्रत्यक्ष एव भगवान् दत्तवान् वरमुत्तमम् ॥ ४७ ॥

---

बाजूला होतें असें जें वर्णन आहे, तेथें सेतूच्या उजव्या एका प्रदेशाला सैन्य होतें अशीच योजना करावी. कारण, सेतु बांधीतोंपर्यंत [पांचरात्रपर्यंत] समुद्राच्या पाण्यांत सैन्य होतें असें ह्मणणें असंभवनीय आहे (४३) असो नंतर दीड श्लोकानें रामानें बांधलेला सेतु सकल जगांत पूज्य असून सर्व पाप नाश करणारा आहे असें वर्णन केलें तर, त्या सेतूच्या ठिकाणीं इतकें माहात्म्य कोणत्या कारणानें वाढलें तो हेतु असा कीं, श्रीरामचंद्रानें तेथें लिंगाची स्थापना करून ईश्वराचा प्रसाद मिळविला ह्मणून त्याचें इतकें माहात्म्य वाढलें. (४४) [तसेंच कूर्म पुराणांतलें वचन] रामायणांतलें चरित्र जेंव्हां लिहिलें आहे, त्यांत रावणाला मारल्यानंतर परत राम निघतांना वर्णन केलें आहे कीं, (४५) "ज्यानें आंगावर चर्म घेतलें आहे, व ज्याच्या कपाळीं अर्धचंद्र शोभतो, अशा शिवाची स्थापना सेतूवर श्रीरामानें केली. (४६) नंतर पार्वतीसहीत शंकर प्रत्यक्ष होऊन उत्तम उत्तम वर त्यास देते झाले. कीं, (४७) हे रामा, त्वां येथें माझ्या लिंगाची स्थापना केली आहे,

ये त्वया स्थापितं लिंगं द्रक्ष्यंति मनुजर्षभाः। महापातक-निर्मुक्तास्ते यांति परमां गतिम् ॥ ४८॥ अन्यानि चैव पापानि स्नातस्यात्रमहोदधौ। दर्शनादेव लिंगस्य नाशं यांति न संशयः ॥ ४९ ॥ यावत्स्थास्यंति गिरयो यावदेव च मेदिनी। यावत्से-तुश्च तावच्च स्थास्याम्यत्र तिरोहितः ॥ ५० ॥ स्नानं दानं तपः श्राद्धं भविष्यत्यक्षयं फलम् स्मरणादेव लिंगस्य दिन-पापं प्रणश्यति" ॥ ५१ ॥ इति वाल्मीकीयं वर्तमानश्वेतवरा-हकल्पावतारवृत्तांतप्रतिपादकमिति तत्प्राचीनलक्ष्मीकल्पवृत्तांत-प्रतिपादककूर्मपुराणवर्णितस्यार्थस्य अत्र पूर्वमित्यनुवादो यु-क्त एव ॥ ५२ ॥ अत्र पूर्वं प्रसन्नः शिव इत्युक्त्या शिवे रा-मचंद्रस्य अनादिसिद्धो भक्त्यतिशय आविष्कृतः। एवं च सेतुबं-

---

तर जे मानव येथपर्यंत येऊन माझ्या लिंगाचें दर्शन घेतील त्यांचे सर्व पाप लयाला जाऊन त्यांना उत्तम गति मिळेल. असा हा माझा तुला वर असो. ( ४८ ) आणि या महासमुद्रांत स्नान करून माझ्या शिवलिंगाचें दर्शन जे घेतील त्यांचीं सर्व पातकें ता-त्काळ नाश पावतील, यांत संशय नाहीं. ( ४९ ) तसेंच जोंपर्यंत पर्वत जगांत राहतील, आणि पृथ्वी जोंपर्यंत असेल, जोंपर्यंत हा सेतु आहे तोंपर्यंत मी येथें गुप्तरूपानें राहतों असें समज. ( ५० ) श्राद्ध, दान, तप, आणि स्नान इत्यादि धर्मकृत्यें त्या लिंगाच्या सान्निधीस केलीं असतां तीं कृत्यें अक्षय फल देणारीं होतात. निदान लिंगाचें स्मरण केलें तरी रोजचें घडणारें पाप नष्ट होतें ( ५१ ) [ येथें कूर्म पुराणांतलें श्लोक संपले. ] आतां प्रस्तुत समयीं चालत असलेल्या श्वेतवराहकल्पांतला रामावताराचा कथाभाग जो वाल्मी-कीनें सांगितला, त्याच्या अगोदरचा लक्ष्मीकल्पांतला कूर्मपुराणांतला कथाभाग ह्मणून जें वर्णन केलें तें बरोबरच आहे. ( ५२ ) आतां येथें सेतु बांधण्यापूर्वीं श्रीरामानें शिवाला प्रसन्न करून घेतलें

धाख्यः सेतुः पूर्वं यत्र प्रसन्नः शिवः तत्र तस्य दिव्यमंदिर-निर्माणार्थं तत्सेवार्थं समागच्छतां गमनागमनसौकर्यार्थं नवटंकच्छेदविनिर्मितचतुरस्राकारैः पाषाणैरेव निर्मितः ॥ ५३ ॥ नलसेतौ तत्संज्ञाभेदात् पूर्वमारभ्य ख्यातत्वपूजितत्ववचनात् तत्रैव पूर्वं शिवस्य प्रसन्नत्ववचनाच्च शिवालयनिर्माणार्थं समुद्रकुक्षौ किंचिद्दूरं प्रविष्टोन्यः नलसेतोरस्य प्राक्सिद्धः सेतुरुक्त इति प्रतिभाति । नलसेतुर्हि न नवटंकच्छिन्नाभिर्नापि केवलं शिलाभिः कृतः । किंतु तरुगुल्मलतादिसहितैर्गिरिशिखरैर्गंडपाषाणैश्च ॥ ५४ ॥ उक्तंहि तत्रैव " ततो विसृष्टा रामेण

---

असें जें वर्णन केलें, यावरून श्रीरामचंद्राची शिवावरची भक्ति अनादिकालापासून आहे, असे सिद्ध होतें. आणि सेतुबंध नांवाचा जो सेतु बांधिला आहे, तो अशा करितां कीं, ज्याठिकाणीं शिव रामाला प्रसन्न झाले, त्या ठिकाणींच सुंदर शिवालय बांधण्याकरितां आणि शिवसेवेला येणाऱ्या यात्रेकरी लोकांचे येण्याजाण्याचे श्रम घालविण्याकरितां नवीन टाकी मारून तयार केलेल्या चौकोनीं दगडांनीं सेतुबंध निर्माण केला. ( ५३ ) त्याच नलसेतूला सेतुबंध आणि नलसेतु अशीं निरनिराळीं नांवें आहेत, आणि पूर्वींपासून सेतुबंध आणि नलसेतु असे प्रसिद्धीस आले आहेत, व पूज्यतेसही पावले आहेत. शिवाय पूर्वीं त्याच सेतुबंधाच्या जागेवर शिव रामाला प्रसन्न झाले, अशीं वचनें आहेत. आणि शिवालय बांधण्याकरितां ह्मणून जो सेतुबंध नांवाचा सेतु बांधिला, तो सेतुबंध समुद्राच्या पोटांत असलेल्या नलसेतूपेक्षां पूर्वीं बांधिलेला असावा असें दिसतें. कारण नलसेतु हा टाकीच्या दगडांनीं किंवा नुसत्या दगडांनीं बांधिलेला नाहीं. नुसत्या झाडांनीं, गुल्मांनीं, वेलींनीं, पर्वताच्या शिखरांनीं ओबड धोबड दगडांनीं तयार केला, असें वर्णन आहे. ( ५४ ) [ आतां याविषयीं कूर्मपुराणांतलेंच प्रमाण

सर्वतो हरियूथपाः । अभिपेतुर्महारण्यं हृष्टाश्शतसहस्रशः ॥ ५५ ॥ ते नगान्नगसंकाशाः शाखामृगगणर्षभाः । बभंजुर्वानरास्तत्र प्रचकर्षुश्च सागरम् ॥ ५६ ॥ ते सालैश्चाश्वकर्णैश्च तथा वंशैश्च वानराः । कुटजैरर्जुनैः सालैस्तिलकैस्तिमिशैरपि ॥ ५७ ॥ बिल्वकैः सप्तपर्णैश्च कर्णिकारैश्च पुष्पितैः । मचैश्चाशोकवृक्षैश्च सागरं समपूरयन् ॥ ५८ ॥ पुष्पिताग्रान् समूलांश्च पादपान् हरिसत्तमाः । इंद्रकेतूनिवोद्यम्य प्रजन्हुरैरयस्तरून् ॥ ५९ ॥ सालान् दाडिमवृक्षांश्च नारिकेलान् विभीतकान् । बकुलान् ककुभान्निंवान् समाजन्हुरितस्ततः ॥ ६० ॥ मेघाभैः पर्वताग्रैश्च तृणैः काष्ठैर्ववंधिरे । पुष्पिताग्रैश्च तरुभिः सेतुं बध्नंति वानराः" इति ॥ ६१ ॥ एवं पा-

---

सांगतात. ] रामानें जिकडे तिकडे वानरसमूहांतले सेनानायक पाठविल्यानंतर हजारों वानर मोठ्या अरण्यांत प्रवेश करून ( ५५ ) त्या पर्वतासारख्या वानरांनीं हजारों पर्वत उचलले, हजारों झाडें तोडिलीं, व कित्येक वानर समुद्राला सुद्धां ओढूं लागले. ( ५६ ) नंतर सालवृक्ष, अश्वकर्ण, वेळू, कुटज, अर्जुन, साल, तिलक, तिमिश, ( ५७ ) विल्व, सप्तपर्ण, कर्णिकार, फुललेलीं झाडें, अशोक इत्यादि वृक्षांनीं त्यांनीं समुद्राला भरून काढिले. ( ५८ ) कांहीं कांहीं श्रेष्ठ वानर ज्या झाडांच्या अग्रभागीं फुलें आहेत, अशीं झाडें कित्येक मुळांसह उपटून आणू लागले, त्यामुळें वानर इंद्राचे केतूच घेऊन चालले आहेत कीं काय असा प्रेक्षकांना भास होत होता. ( ५९ ) तसेंच साल, दालिंब, नारळ, बिबे इत्यादि झाडें आणि बकुल, कुकुभ, निंब अशीं ही कित्येक झाडें त्या वानरांनीं उपटून आणिलीं. ( ६० ) नंतर मेघाप्रमाणें भासणाऱ्या पर्वतांनीं, गवतांनीं, लांकडांनीं, फुलांच्या वृक्षांनीं सर्व वानर सेतु बांधावयाला लागले. ( ६१ ) या वर्णनावरून झाडें, दगड अशांनींच सेतु बां-

दपादिसहितैः पाषाणैः कृतः सेतुस्तात्कालिकसंचारमात्रोपयोगी न चिरं सिंधोरुपरिस्थायीति नलसेतुतः सेतुबंधोन्य इति स्फुटं प्रतिभातीति विमर्शनीयं विद्वद्भिः ॥ ६२ ॥ ननु कूर्म-पुराणे सेतोः स्थायित्वं दर्शितं तथा स्कांदे नागरखंडेऽपि ॥६३॥ तत्र हि "यदि कश्चित्समायाति मनुष्योत्र कथंचन। मत्कारणान्न हंतव्यः सर्वैरेव निशाचरैः ॥ ६४ ॥ तथा निशाचराः सर्वे त्वया वार्या विभीषण। मम सेतुं समुल्लंघ्य न गंतव्यं धरा-तले" इति श्रीरामचंद्रवचनं ॥ ६५ ॥ "भविष्यंति कलौ काले दरिद्रा नृप मानवाः। तत्र स्वर्णस्य लोभेन देवतादर्शनाय

---

धिला असून तात्पुरता समुद्र तरून जाण्याकरितांच तो बांधला असावा, नाहींतर चिरकाल सेतु रहावा अशा उद्देशानें बांधावयाचा असता तर असा हलगर्जीपणा त्यांनीं मुळींच केला नसता. एकं-दरींत सेतु तात्पुरताच बांधला होता, असें सिद्ध झालें. दुसरें असें कीं, अर्थातच टाकीच्या दगडांनीं बांधलेला सेतुबंध हा त्याहून नि-राळा होता असें विद्वानांस सहज दिसेल. ( ६२ ) येथें पुनः एक शंकाकार ह्मणतो कीं, कायहो, कूर्मपुराणांत रामानें जो सेतु बांधला, तो चिरकाल राहण्याकरितांच बां-धिला असें वर्णन आहे, आणि स्कांदपुराणांत नागरखंडांत सुद्धां असेंच वर्णन आहे, पहा त्या त्या पुराणांतलीं वचनें दाखवितों. ( ६३ ) त्या कूर्मपुराणांत रामानें बिभीषणाला असें सांगितलें कीं, अरे विभीषणा, येथें [ या पुलावर ] जर कोणी मनुष्य कदाचित् आला तर माझ्या पक्षांतल्या तुह्मां राक्षसांपैकीं त्या मनुष्याला कोणींही मारूं नये. ( ६४ ) तसेंच विभीषणा तुझ्या सर्व राक्षसांना तूं सांग कीं, या पुलावरून कोणीही समुद्र ओलांडून पृथ्वीवर जाऊं नये. असें रामाचें बोलणें ऐकून बिभीषण ह्मणतो ( ६५ ) हे क्षत्रिय श्रेष्ठा रामा, कलियुगांत सर्व मनुष्यें दरिद्री होतील, तेव्हां देवाच्या

च ॥ ६६ ॥ नित्यं चैवागमिष्यंति सत्त्वा रक्षःकृतं भयम्। तेषां यदि वधं कश्चिद्राक्षसः प्रापयिष्यति ॥ ६७ ॥ भविष्यति च मे दोषः प्रभुद्रोहोद्भवः प्रभो । तस्मात्किंचिदुपायं त्वं चिंतयस्व यथा मम । आज्ञाभंगकृतं पापं जायेत न सुरोत्तम" इति विभीषणस्य प्रतिवचनं प्रदर्श्य ॥ ६८ ॥ "तस्य तद्वचनं श्रुत्वा ततः स रघुसत्तमः । बाढमित्येव चोक्त्वाऽथ चापं सज्जीचकार सः ॥ ६९ ॥ ततस्तं कीर्तिरूपं च मध्यदेशे रघूत्तमः । आच्छिनत्सुशितैर्बाणैर्दशयोजनविस्तृतः" इति मनुष्याणां द्रव्यलोभाल्लंकापर्यंतगमनं माभूदित्येतदर्थं रघु-

---

दर्शनाकरितां किंवा सुवर्णाच्या लोभामुळें (६६) दररोज ते दरिद्री लोक इकडे येतील, त्यावेळीं त्यांना इकडे जरी राक्षसांची भीति आहे हें ठाऊक असलें, तथापि दारिद्र्यानें ते गांजलेले असल्यामुळें ती भीति ते न जुमानतां लंकेस येतील, तेव्हां कोणी तरी एखाद्या राक्षसानें त्यांचा वध केला तर (६७) प्रभो रामा, विनाकारण माझ्या पदरांत प्रभुद्रोहाचा दोष येण्याचा संभव आहे, याकरितां आपण याविषयीं कांहीं तरी तोड काढा. आणि आपल्या आज्ञेचा भंग केल्याबद्दलचा दोष मला न लागेल असा विचार करा. (६८) याप्रमाणें विभीषणाचें भाषण ऐकून "बरें आहे, तसेंच करितों," असें सांगून श्रीरामचंद्रानें धनुष्य सज्ज केलें. (६९) आणि धनुष्याला बाणसंधान करून तो तीक्ष्ण बाण आपल्या कीर्तिरूप सेतूच्या मध्यभागीं मारून चाळीस कोसपर्यंत सेतूचा उच्छेद केला. (पाडिला) असो. येथपर्यंत कथाभाग सांगून शंकाकार ह्मणतो कीं, द्रव्यलोभी मानवांना लंकेपर्यंत जातां येऊं नये ह्मणून रामानें सेतु चाळीस कोसपर्यंत मध्येंच पाडून टाकिला, असें जें वर्णन केलें, यावरून तो सेतु चिरकाल राहण्याकरितांच बांधिला होता, असें सिद्ध होत

नाथेनैव मध्यभागे सेतुच्छेदः कृत इति वर्णितं ॥७०॥ सत्यं, कूर्म पुराणोक्तं तावत्कल्पांतरवृत्तांतविषयमित्युक्तं नागरखंडोक्तमपि कल्पांतरवृत्तांतविषयमेव तत्र हि वैकुंठयात्रार्थं समाव्हानाय देवदूतागमनानंतरं स्वयं वैकुंठयात्रां करिष्यता श्रीरामचंद्रेण पुष्पकमारुह्य किष्किंधामार्गेण सुग्रीवेण सह लंकां गत्वा तत्र दशरात्रमुषित्वा प्रतिनिवृत्तिसमये सेतोरादिमध्यांतेषु रामेश्वराख्यं लिंगत्रयं प्रतिष्ठाप्य तत्र विभीषणायेयं बुद्धिरुपदिष्टेति वर्णितं। अतः कथाभेदात्तदपि कल्पांतरवृत्तान्तविषयमेव ॥ ७१ ॥ कल्पांतरसेतुर्यावत्प्रलयस्थायीति पुनः प्रवृत्ते कल्पे सेत्वंतरनिर्माणमुपपद्यते। शिवमंदिरनिर्माणार्थं किंचिद्दूरं

---

नाहीं काय ? (७०) त्यावर उत्तर असें कीं, बाबा, तुझी शंका खरी आहे, तथापि तो कथाभाग दुसऱ्या कल्पांतला आहे, प्रस्तुत असलेल्या वराहकल्पांतली ती कथा नव्हे. तसेंच नागरखंडामध्यें सांगितलेली कथा सुद्धां दुसऱ्या कल्पांतली आहे. तेव्हां [ दुसऱ्या कल्पाच्या वेळेस ) वैकुंठाला तुम्ही [ रामा ] या, असें बोलावण्याकरितां देवदूत आल्यानंतर स्वतः श्रीराम वैकुंठाला जाण्याकरितां पुष्पक विमानांत बसून किष्किंधेच्या रस्त्यावरून जातांना सुग्रीवाला बरोबर घेऊन लंकेला जाऊन तेथें दहा दिवस राहून परत निघतांना सेतूच्या आदिभागीं, मध्यभागीं आणि अंत्यभागीं त्यानें रामेश्वर नांवाच्या तीन लिंगांची तीन ठिकाणीं स्थापना केली व बिभीषणाला मागें सांगितल्याप्रमाणें उपदेश केला, असो. याप्रमाणें कथाभागांत सुद्धां ज्याअर्थी भेद दिसून येतो, त्याअर्थीं ती कथा दुसऱ्या कल्पांतलीच आहे, असें ह्मणावें लागतें, (७१) तेव्हां कल्पांतरांत बांधलेला सेतु प्रलय जोंपर्यंत झाला नाहीं, तोंपर्यंत राहतो, प्रलयानंतर दुसऱ्या कल्पाचा प्रारंभ जेव्हां होतो, तेव्हां दुसरा सेतूच बांधला पाहिजे. आणि

कृतः सेतुबंधस्तु शिवाज्ञया कल्पांतरेऽपि तिष्ठतीत्येतदुपपद्यत इति न कश्चिद्वा विरोधः ॥ ७२ ॥ “ अबद्धपूर्वमितरैर्बध्वा सेतुं महोदधौ । द्गतो वानरकोटीभिः समुत्तीर्य महार्णवं ” इति भारतवचने ॥ ७३ ॥ सेतोः पूर्वमितरैरबद्धत्वोक्तिस्तु पूर्वमपि रघुनाथेनैव कृतो न त्वितरैरित्येतदभिप्रायेणोपपद्यते अध्यात्मरामायणकृता तु ॥ ७४ ॥ “ सेतुमारभमाणस्तु तत्र रामेश्वरं शिवम् । संस्थाप्य पूजयामास रामो लोकहिताय च ॥ ७५ ॥ प्रणमेत्सेतुबंधं यो दृष्ट्वा रामेश्वरं शिवम् । ब्रह्महत्यादिदोषेभ्यो मुच्यते तदनुग्रहात् ” इति ॥ ७६ ॥ नलसे-

---

कल्पांतराच्या वेळेस शिवमंदिर बांधण्याकरितां सेतुबंध हा नलसेतूपेक्षां कांहीं अंतरावर दूर बांधला होता असें ह्मटलें असतां कांहीं विरोध येत नाहीं. ( ७२ ) [ आणि महाभारतांतही असें वर्णन केलें आहे कीं, ] “ पूर्वीं दुसऱ्यांनीं कधींही बांधिला नव्हता, असा अपूर्व सेतु समुद्रांत बांधून कोट्यावधि वानरांना बरोबर घेऊन श्रीराम समुद्र ओलांडून गेले. ( ७३ ) ” त्यावरून रामापेक्षां पूर्वीं कोणींही सेतु बांधिला नव्हता, असें सिद्ध होतें. दुसरें असें कीं, रामानेंच सेतु बांधला, दुसऱ्यांनीं बांधला नाहीं हाच अभिप्राय सयुक्तिक दिसतो. अध्यात्मरामायण ग्रंथकारानें लिहिलें आहे कीं, ( ७४ ) “ सेतु बांधावयाला आरंभ करितांना पूर्वीं लोकांच्या कल्याणाकरितां रामानें रामेश्वरलिंगाची स्थापना करून स्वतः रामेश्वराची पूजा केली. ( ७५ ) त्या सेतुबंधाला पाहून रामेश्वरशिवाला जो नमस्कार करितो, तो ब्रह्महत्या करणारा असला तरी शिवाच्या अनुग्रहानें मुक्त होतो. ” ( ७६ ) या वर्णनावरून नलसेतूपेक्षां पूर्वीं सेतुबंध बांधला होता असें सिद्ध होतें. कारण, सेतूच्या अगोदर रामेश्वराची स्थापना केली असें वर्णन केलें आहे. पुनः राम परत निघते वेळेस वर्णन

त्वारंभसमये रामेश्वरप्रतिष्ठा वर्णिता । प्रतिप्रयाणसमये च ॥ ७७ "एष सेतुर्मया बद्धः सागरे सलिलार्णवे । एतत्तु दृश्यते तीर्थं सागरस्य महात्मनः ॥ ७८ ॥ सेतुबंध इति ख्यातं त्रैलोक्येन च पूजितम् । एतत्पवित्रं परमं दर्शनात्पातकापहम् ॥ ७९ ॥ अत्र रामेश्वरो देवो मया शंभुः प्रतिष्ठितः" इति सीतां प्रति श्रीरामचंद्रोक्तिवर्णनेन च तद्दृढीकृतम् ॥ ८० ॥ तदित्थं पुराणांतरं दृष्ट्वा वर्णितम् "सेतुबंधइति ख्यातं त्रैलोक्येनाभिपूजितं" इत्यादिवाल्मीकीय रामायणवचनसंदर्भाभिप्रायमित्थमुन्नीय वर्णितं वेति न विद्मः। उदाहृतवाल्मीकीयरामायणवचनसंदर्भस्यापि नलसेतुनिर्माणारंभसमये रामेश्वरप्रतिष्ठा कृतेत्यभिप्रायकल्पने सेतुबंधनिर्माणपूर्वकं

---

केलें कीं, (७७) "हे सीते समुद्रांत हा सेतु म्यां बांधिला. हें पहा, महात्म्या सागराचें तीर्थ दिसतें, (७८) इकडे हें पाहिलेंस कां? याला सेतुबंध महास्थान ह्मणतात. या जागेची पूजा त्रैलोक्य करितें. हें स्थान परम पवित्र असून दर्शनमात्रानें हें सर्व पाप नाश करणारें आहे. (७९) येथेंच रामेश्वर परशिवाचीं स्थापना म्यां केली." याप्रमाणें सीतेला रामानें सांगितल्यावरून नलसेतूपेक्षां सेतुबंध पूर्वींचा होता ह्मणून निश्चयानें दृढतर सिद्ध होतें. (८०) याप्रमाणें अनेक अन्य पुराणांतलीं वचनें पाहूनच वाल्मीकीनें आपल्या ग्रंथांत वर्णन केलें कीं, "सेतुबंध इति ख्यातं त्रैलोक्येनापि पूजितम्" इत्यादि वाल्मीकीच्या रामायणांतल्या संदर्भाला अनुसरून वर्णन केलें आहें किंवा नाहीं हे आह्मी सांगूं शकत नाहीं. उदाहरणार्थ दिलेल्या वाल्मीकी रामायणांतल्या संदर्भावरून सुद्धां नलसेतु बांधण्याला आरंभ करितांना रामेश्वर परशिवाची रामानें स्थापना केली,

तत्र रामेश्वरं प्रतिष्ठाप्य सेतुबंधरामेश्वरदर्शने महाफलत्वं च श्रीरामचंद्रेण नियतमिति ॥ ८१ ॥ ततःप्रभृति महापातक नाशनमिदं तीर्थं त्रैलोक्येनाभिपूजितं इह रामेश्वरश्च रावणवधसिध्यर्थं प्रसन्नोभूदित्येतदर्थतया स्वारस्यं भजत एव ॥८२॥ अस्मिन् पक्षे रामेश्वरादिव्यमंदिरपर्यंतं सेवार्थिनां गतागतसौकर्याय टंकच्छिन्नपाषाणैः स्थायिनं सेतुबंधं निर्माय स तदग्रे स्कंधावारं निवेश्य ततःप्रभृति तात्कालिकस्वसेनागतागतोपयुक्तं सेतुं तरुगुल्मादिसहितैः शैलशिखरादिभिर्नलेन कारयामासेति योजनीयं ॥ ८३ ॥ वाल्मीकीये हि रामायणे प्रा-

---

अशा अभिप्रायाची कल्पना केली तरच सेतुबंध रामेश्वराच्या दर्शनानें महाफल मिळतें, असें रामानें नियमानें केलेलें विधान सयुक्तिक दिसतें. ( ८१ ) ह्मणूनच त्यादिवसापासून " महापातकनाशन मिदं तीर्थं त्रैलोक्येनाभिपूजितम् " हें रामाचें वाक्य आणि " रावणाच्या वधाच्या सिद्धीकरितां येथेंच मी रामेश्वर परशिव प्रसन्न करून घेतला " हें वाक्य अशीं हीं दोन्हीं वाक्यें शिवभक्त शिवोपासक लोकांना विशेषें करून स्वारस्य देणारीं होतात. असो. ( ८२ ) [ आतां ज्या पक्षाचें समर्थन केलें. तो पक्ष घेऊन आह्मी सांगतों असें ग्रंथकार ह्मणतात. ) या रामेश्वराच्या सुंदर मंदिरापर्यंत येणाऱ्या शिवभक्तांचे येण्याजाण्याचे श्रम दूर होऊन त्यांना सुख मिळण्याकरितां टाकीच्या दगडांनीं चिरकाल राहणारें सेतुबंध नांवाचें महास्थान निर्माण करून त्याच्यापुढें रामानें सेनेचा तळ दिला. नंतर तेव्हांपासून तात्पुरता आपल्या कामाला उपयोगीं पडावा ह्मणून झाडें, वेलीं, गुल्में आणवून तसेंच पर्वताचीं शिखरें वगैरे आणवून नल नांवाच्या वानराकडून सेतु करविला, अशीच योजना करावी. ( ८३ ) कारण, वाल्मीकिरामायणांत सुद्धां पूर्वीच्या वृत्तांताचें

चीनवृत्तांतस्य पश्चादुद्घाटनमन्यत्रापि दृश्यते ॥ ८४ ॥ यथा काकवृत्तांतस्य यथा वा रावणगृहोषितसीतार्थपायस प्रेषणवृत्तांतस्य यथा वा अंधमुनिकृतदशरथशापवृत्तांतस्य । एवं सेतुबंधनिर्माणवृत्तान्तस्यापि भविष्यतीति न काचिदनुपपत्तिः । सेतुबंधसाधारण्येन नलसेतुत्वव्यवहारस्तु पश्चादुभयोरेकीकरणान्नलसेतुभागभूम्नोपपद्यते ॥ ८५ ॥ श्रीरामचंद्रचरितं विशेषैस्तस्य शिवे भक्त्यतिशयाभिव्यक्तिमाविष्कर्तुं तानेव चरितविशेषान् श्लोकत्रयेण निबध्नाति ॥ ८६ ॥ "श्रांतः सु-

---

मागाहून वाल्मीकीनें उद्घाटन केलेलें दिसतें. आतां अशी कोणी शंका घेतील कीं, वाल्मीकीनें प्रथमतः एकदां वृत्तांत सांगून नंतर त्याचीच पुनरावृत्ति केली हें कसें जुळतें? त्याला दृष्टांत देऊन उत्तर देतात. (८४) पूर्वी एकदां दशरथ राजा सहज फिरत असतांना एका पक्ष्यानें भविष्य सांगितलें कीं, तुला पुत्रशोक होईल नंतर तोच राजा पुढें कांहीं दिवसांनीं शिकारीस गेला होता, तेव्हां एका आंधळ्या मुनीनें त्याला शाप दिला कीं, राजा तुला माझ्याप्रमाणेंच पुत्रशोक होऊन मरण येईल. हीं दोन्हीं वाक्यें निरनिराळ्या समयांतलीं जरी आहेत, तथापि या दोन्हीं वाक्यांना परस्पर बाध येत नाहीं, तद्वत् वाल्मीकीनें सांगितलेल्या वाक्यांना बाध येत नाहीं. तसेंच सेतुबंधाला नलसेतूचा व्यवहार जो जगांत आला, तो व्यवहार सुद्धां मागाहून बांधलेल्या नलसेतूला सेतुबंध जोडलेला असल्यामुळें सेतुबंधाला सुद्धां नलसेतु असें नांव पडलें ह्मणून कांहीं बाध येत नाहीं. [पुनः ग्रंथकार प्रस्तुत विषयाकडे वळतात.] (८५) श्रीरामचंद्राच्या त्या त्या मुख्य मुख्य चरित्रांनीं परशिवाचे ठिकाणीं रामाची अतिशय भक्ति होती, असें ठरतें, हें दाखविण्याकरितां त्याच चरित्रांनीं गोंवलेले तीन श्लोक सांगतात.

दीर्घसमरेण रघुप्रवीरश्चिताकुलः कलशयोनिकृतोपदेशः । ब्रह्माच्युतत्रिनयनेश भवत्स्वरूपं स्तोत्रेण यद्रिपुजयाय रविं प्रपन्नः ॥ ८७ ॥ रक्षोधिपो निहत एव दिवं प्रयाहि कार्यं कृतं खलु न इत्युदिते विधात्रा । राज्यस्थितः कुरु तुरंगममेधयज्ञमित्युक्तिमेव जगृहे तव यच्च शंभो ॥ ८८ ॥ इक्ष्वाकुवंशभवराज्यपदे निविष्टस्त्वामेव यच्च सुचिरं हयमेधक्लृप्त्या ।

---

( ८६ ) " हे शंभो, जेव्हां लंकेंत राक्षसांशीं फार वेळ लढाई करितां करितां राम थकून गेला, आणि तो चिंतेनें व्याकुळ झाला, त्यावेळेस अगस्त्य महामुनीनें उपदेश केला कीं, " हे रामा, शत्रूला जिंकण्याकरितां ब्रह्मा, विष्णु, शिव ह्या तीन मूर्तींनीं ज्याचें एक रूप झालें आहे, त्या सूर्याच्या पोटांत अंतर्गत असलेल्या पराशिवाची तूं स्तुति कर." असा उपदेश ऐकून रामानेंही सूर्यनारायणाला निमित्त करून सर्वोत्कृष्ट पराशिवाची स्तुति प्रेमानें व भक्तीनें करुणापूर्वक दीनस्वरानें केली. (८७) नंतर त्या स्तोत्रानें शिव प्रसन्न होऊन वर देते झाले कीं, " रामा आतां लवकरच तूं रावणाला मारशील. " या वराच्या सामर्थ्यानें रामानें जेव्हां रावणाला मारिलें, तेव्हां ब्रह्मदेवानें रामाला सांगितलें कीं, " हे रामचंद्रा, राक्षसेश्वर यमाच्या घरीं गेला, आमचें कार्य झालें तूं स्वर्गास जा. " त्याचवेळीं शंकरा आपण रामास सांगितलें कीं, " रामा तूं आधीं आयोध्येस जा व तुला राज्याभिषेक झाल्यावर कांहीं दिवसांनीं परब्रह्म पराशिवाला उद्देशून तूं अश्वमेधयज्ञ कर, ह्मणजे तुझीं सर्व पापें जातील, नंतर त्या पुण्यप्रभावानें तुं स्वर्गाला जा. " तेव्हां रामानें ब्रह्मदेवाचें वचन अमान्य करून आपल्या ह्मणण्याप्रमाणेंच केलें (८८) हे ईश्वरा, नंतर इक्ष्वाकु कुळांतल्या राज्यपदावर बसून अश्व-

ईजे कथांतरगिरा शिव तेन चक्री यष्टव्य इत्यवरजस्य निरस्य भावं ” ॥ ८९ ॥ रावणयुद्धसमये “ ततो युद्धपरिश्रांतं समरे चिंतया स्थितम् । रावणं चाग्रतो दृष्ट्वा युद्धाय समुपस्थितम् ॥ ९० ॥ दैवतैश्च समागम्य द्रष्टुमभ्यागतो रणम् । उपगम्याब्रवीद्राममगस्त्यो भगवानृषिः ” ॥ ९१ ॥ इत्युपक्रम्यागस्त्यकृतादित्यहृदयोपदेशं प्रदर्श्य श्रीरामचंद्रस्तु-

---

मेधयज्ञ करण्याचा जेव्हां रामानें उद्योग केला, तेव्हां अन्यमताला अनुसरून चालणाऱ्या कांहीं दुष्टांनीं त्याला असा बोध केला कीं, हे रामचंद्रा, आपण जो याग करणार, तो याग चक्री [ सुदर्शनधारी ) विष्णूला उद्देशून करा, ह्मणजे तुह्माला मुक्ति मिळेल, असा त्या दुष्टांचा उपदेश ऐकून त्या उपदेशाचा रामाला फार संताप येऊन त्यानें ह्मटलें कीं, मंत्रिवर्गहो, अशा दुष्टांना आमच्या राज्यांत ठेवणें फार अकल्याणकारक आहे, याकरितां आतांच्या आतां यांना हद्दपार करा. तें ऐकून त्या अन्य मताच्या लोकांना मंत्रिवर्गांनीं हद्दपार केलें, तेव्हां सात्विक पराशिवतत्व जाणणाऱ्या महामुनीश्वरांच्या संमतीनें तो अश्वमेध यज्ञ करून शेवटीं पूर्णाहुति “ पराशिवाय स्वाहा ” असें ह्मणून घातली. व अशा समारंभानें तो याग पार पाडिला. याप्रमाणें ग्रंथकारानें आपले श्लोक सांगून त्याला प्रमाणाकरितां ह्मणून रामायणांतलें वचन सांगितलें, तें असें ( ८९ ) “ रामरावणाचें युद्ध चाललें असतांना युद्धांत श्रमलेला राम विचारांत पडला कीं, काय करावें ? हा शत्रु तर दंड थोपटून माझ्यापुढें तयार आहे, हा कांहीं लवकर मरत नाहीं, याला काय करावें? ( ९० ) याप्रमाणें राम मोठ्या विंवचनेंत पडला असतां अनायासें सर्व देवांना बरोबर घेऊन भगवान् अगस्त्यऋषि युद्ध पाहण्याकरितां त्याचवेळेस तेथें आले, आणि समोर चिंतातुर झालेल्या रामाला

पादेष्टादित्यहृदयस्तोत्रं जप्त्वा तद्विश्वासेन चिंतां विहाय हर्षेण रावणवधोद्युक्त आसीदिति प्रपंचितम् ॥ ९२ ॥ आदित्यहृदयं च शिवविषयम् ॥ ९३ ॥ "ब्रह्मेशानाच्युतेशाय सूर्यायादित्यवर्चसे । भास्वते सर्वभक्षाय रौद्राय वपुषे नमः ॥ ९४ ॥ इत्यादित्यस्य त्रिमूर्त्यधिपतित्वमुक्त्वा तदुपपादनाय रौद्राय वपुष इति स्तोत्रस्य आदित्यांतर्यामिशिवपर्यंतत्वाविष्करणात् ॥ ९५ ॥ नमो हिरण्यबाहवे हिरण्यपतयेंऽबिकापतय उमापतये नमो नमः । असौ यस्ताम्रो अरुण उत बभ्रुः सुमंगलः । नमो ह मायन् महामाय मोहमायेत्यादि

---

पाहून अगस्त्यमहामुनींनीं आदित्यहृदयाचा उपदेश केला; असें दाखऊन नंतर अगस्त्यऋषींच्या आज्ञेप्रमाणें आदित्यहृदय स्तोत्राचे जप करून त्या महात्म्याच्या उपदेशावर विश्वास ठेऊन मनांतली सर्व काळजी सोडून रावणाला मारण्याकरितां पुनः राम सज्ज झाला, असें विस्तारानें वर्णन केलें. (९२) आतां आदित्यहृदय हें शिवपर आहे असें दाखवितात. (९३) ब्रह्मा, विष्णु, ईशान यांचा स्वामी, अशा हे आदित्या, [ हे सूर्या ] बारा सूर्यांपेक्षां ज्याचें तेज जास्त आहे, अशा हे भास्वन्, हे रुद्रशरीरा, तुला मी नमस्कार करितों. (९४) ह्याप्रमाणें आदित्यहृदयांतल्या श्लोकांत सूर्याला त्रिमुर्तींचा [ ब्रह्माविष्णुमहेश्वरांचा ] स्वामी असें विशेषण देऊन आधिपत्य दृढ करण्याकरितां शेवटीं "रौद्राय वपुषे नमः" असें ह्मटलें. यावरून अर्थांत आदित्यांतर्यामी [ आदित्याच्या पोटांत असलेल्या ] परशिवाचीच उपासना रामानें केली, असें ठरतें. (९५) आणि दुसरें असें कीं, 'नमो हिरण्यबाहवे' 'हिरण्यपतयेंऽबिकापतये' 'उमापतये' नमो नमः 'असौ यस्ताम्रो अरुण' 'उत बभ्रुः सुमंगलः' 'नमो ह मायिन् महामाय मोहमाय" इत्यादि वेदोक्त

स्योपासनार्थवैदिकमंत्रभागानामादित्यांतर्यामिशिवपर्यंतत्वदर्शनेन वेदोपबृंहणार्थे रामायणे पठितस्यादित्यहृदयस्यापि तत्पर्यंतत्वावश्यंभावाच्च ॥ ९६ ॥ रावणवधानंतरमग्निप्रवेशितां सीतां ग्राहयितुं समागतेषु देवेषु ब्रह्मणा प्रतिपादितम् ॥ ९७ ॥ "तदिदं नः कृतं कार्यं त्वया धर्मभृतां वर। निहतो रावणो राम प्रहृष्टो दिवमाक्रम" इति ॥ ९८ ॥ तदनंतरं शिवेन तु "प्राप्य राज्यमयोध्यायां सांत्वयित्वा सुहृज्जनम्। इक्ष्वाकूणां कुले राज्यं स्थापयित्वा महाबल ॥ ९९ ॥ इष्ट्वा तुरगमेधेन प्राप्य चानुत्तमं यशः। ब्राह्मणेभ्यो धनं दत्वा त्रिदिवं गंतुम-

---

[ वेदांत सांगितलेल्या ] मंत्रांनीं उपासना केली, असें सांगितल्यावरून आदित्यांतर्यामी पराशिवाचीच उपासना केली असें ठरतें. कारण, वरील मंत्र शिवपर आहेत, आतां रामायणांतलें आदित्यहृदयस्तोत्र वरील वेदोक्त मंत्राला अनुसरूनच केलें आहे, यावरून आदित्यहृदय हें शिवपरच आहे, असें स्पष्टपणें सिद्ध झालें. ( ९६ ) रावणाला रामानें मारल्यानंतर जानकीनें आपलें पातिव्रत्य [ पतिव्रतपणा ] कडक आहे, असें दाखविण्याकरितां अग्निमध्यें उडी मारून आपला शुद्धपणा दाखविला, तरी जेव्हां राम तिचा स्वीकार करीना, तेव्हां रामाला बोध करण्याकरितां सगळे देव तेथें आले, व ब्रह्मदेवही आला. आणि ब्रह्मदेवानें ह्मटलें कीं, ( ९७ ) हे धार्मिका रामा, त्वां आमचें कार्य केलें, त्वां रावणाला मारिलें, आतां आनंदानें स्वर्गाला ये. ( ९८ ) नंतर शिवांनीं बोध केला कीं, बा रामा, तूं आधीं अयोध्येला जा, आणि राज्याभिषेक करून घे, तसेंच आप्त वर्गांचें समाधान कर, इक्ष्वाकूच्या घराण्यांत राज्य ठेव, ( संतती उत्पादन करून पुत्राला राज्याभिषेक कर. ) [ ९९ ] नंतर अश्वमेध यज्ञ कर, कीर्ति मिळीव. ब्राह्मणांना पुष्कळ द्रव्य

ईसि " इत्युक्तं ॥ १०० ॥ तत्र ब्रह्मवचनमनादृत्य शिववचनमेवांगीकृतम् । तदंगीकृत्यायोध्यां प्राप्य राज्यं परिपालयता च शिवोपदेशं मनसि निधायाश्वमेधः कृतः । अश्वमेधेन शिवएवाराधितः ॥ १०१ ॥ कथमिदं ज्ञायते " शिवएवाराधित इति " अश्वमेधोद्योगसमये प्रागश्वमेधेन विष्णुराराधित इति प्राचीन कथोपन्यासेन लक्ष्मणस्य चिकीर्षितेनाश्वमेधेन विष्णुराराधनीय इति भावं विदित्वा तेन शिव आराधित इति रघुनाथः कथांतरोपन्यासेन ॥ १०२ ॥ " नान्यं पश्यामि भैषज्यमंतरेण

---

देऊन त्यांचे आशीर्वाद घेऊन मग स्वर्गाला जा. ह्या प्रमाणें शिवानें सांगितलें. ( १०० ) नंतर रामानें ब्रह्मदेवाच्या वचनाचा अनादर करूच शिवाच्या वचना प्रमाणेंच केलें. ह्मणजे अयोध्येला येऊन राज्यावर आरोहण करून राज्य करीत असतांना शिवोपदेशाची आठवण ठेवून अश्वमेध यज्ञानें त्यानें परशिवाचीच आराधना केली. ( १०१ ) पुनः येथें शंकाकार ह्मणतो कीं, कांहो रामानें शिवाची आराधना केली असें सांगितलें, हें कशावरून? कारण, अश्वमेधाच्या आरंभाच्या वेळेस लक्ष्मणानें सांगितलें कीं, पूर्वीं एकदां अश्वमेध केला होता तेव्हां विष्णूची आराधना केली होती, आतां ही या अश्वमेधाच्या वेळेस विष्णूला उद्देशून च यज्ञ करा. या लक्ष्मणाच्या वाक्यावरून रामानें विष्णूची आराधना केली असें होत नाहीं काय? तुह्मी रामानें शिवाची आराधना केली ह्मणून कसें ह्मणतां? या शंकेला उत्तर देतात. बाबा, ऐक. तुला सांगतों. तुझ्या [ शंकाकाराच्या ] ह्मणण्याप्रमाणें लक्ष्मणानें रामाला सांगितलें येथपर्यंत तुझी [ शंकाकाराची ] गोष्ट खरी. परंतु हा लक्ष्मणाचा भाव जाणून रामानें काय ह्मटलें तें ऐकलेंस कां? राम ह्मणाले, ( १०२ ) लक्ष्मणा, या भवरोगाला वृषध्वज [ नंदी ज्याच्या

वृषध्वजम् । नाश्वमेधात्परो यज्ञः प्रियश्चैव महात्मनः ” ॥१०३॥ इति कथांतरगतवचनोपन्यासेन च स्वयमश्वमेधेन च शिव आराधनीय इति स्वाशयमाविश्चकार । तथैव ऋत्विग्भिरपि शिवप्रीत्यर्थमेवाश्वमेधः कारित इत्येतत् । “ ते तु रामवचः श्रुत्वा नमस्कृत्य वृषध्वजम् । अश्वमेधं द्विजाः सर्वे पूजयंति स्म नित्यशः ” । इति श्लोकेन व्यंजितम् । अतः श्रीरामचंद्रः शिवमेवाराधितवानिति ज्ञायते ॥ १०४ ॥ एतैश्चरितविशेषैः श्रीरामचंद्रस्य शिवे दृढा भक्तिराविष्कृतेत्युक्तिपूर्वकं कवेरपि शिवस्य महिमातिशये तात्पर्यं तदीयवचनार्थलिंगेन दर्शयति

---

पताकेवर आहे अशा ] त्या परशिवावांचून दुसरें औषध दिसत नाहीं. त्या परशिवाच्या प्रीती करितां सर्व यज्ञांत श्रेष्ठ असा अश्वमेधयज्ञ करून सर्व देवांत श्रेष्ठ अशा परशिवाची आराधना करून त्याची प्रीति संपादन करावी हे चांगलें. कारण, परशिवाला अश्वमेधयज्ञ फार आवडीचा आहे. ( १०३ ) याप्रमाणें दुसऱ्या कथानकानें स्वतः अश्वमेधयज्ञानें शिवाचीच आराधना करावी, असा आपला आशय [ अभिप्राय ] रामानें प्रकट केला. तसेंच तेथें असलेल्या ऋत्विजांनीं रामाचा आशय जाणून शिवप्रीत्यर्थच [ शिवाच्या प्रीतीकरितां ] रामाकडून यज्ञ करविला. अशा अर्थाच्या “ते तु रामवचः श्रुत्वा नमस्कृत्य वृषध्वजम् । अश्वमेधं द्विजाः सर्वे पूजयंति स्म नित्यशः ॥” या श्लोकाचा अर्थ असा कीं, [ ऋत्विजांनीं रामाचें भाषण ऐकून वृषध्वज शिवाला नमस्कार करून निरंतर त्या रामाच्या अश्वमेधाची फार फार प्रशंसा केली. ] या श्लोकानें शिवाचीच आराधना केली असें सिद्ध होतें. इत्यादि अनेक प्रमाणांवरून रामानें शिवाची सेवा केली, असें सिद्ध होतें. ( १०४ ) मुख्य मुख्य चरित्रावरून परशिवाचे ठिकाणीं रामाची दृढ भक्ति असलेली व्यक्त झाली,

॥ १०५ ॥ " एतैस्त्वयि प्रकटिता रघुनंदनस्य भक्तिः स्थिरा परतरत्वमतिश्च नित्या । मुन्यक्तमादिकविना स्वयमात्मनश्च रुद्रः स विष्णुरिव चेत्युपमोक्तिभंग्या ॥ १०६ ॥ कृताभिषेकः स रराज रामः सीताद्वितीयः सह लक्ष्मणेन । कृताभिषेको गिरिराजपुत्र्या रुद्रस्स विष्णुर्भगवानिवेशः ॥ १०७ ॥ इत्युपमानिबंधेन कविरपि स्वयं शिवः सर्वातिशायि महिमशालीति स्वतात्पर्यमाविश्चकारेत्यर्थः । अथ कवेः शिव एव सर्वजगन्नियंतेत्यत्र तात्पर्यं हेतुभिराविष्कर्तुं तत्तावत्प्रतिजानीते ॥ १०८॥

---

अशा या कवीच्या सांगण्यावरून कवि सुद्धां मोठा शिवभक्त होता, आणि शिवमहिमा प्रकट करणारा होता असें ठरतें. कवीचा आशय समजण्याकरितां कवीचीं वचनें उदाहरणाकरितां येथें देतात. ( १०५ ) हे परब्रह्मस्वरूपा, परशिवा, येथपर्यंत वर्णन केलेल्या रामाच्या या चरितांनीं आपल्या ठिकाणीं [ शिवाचे ठिकाणीं ] रामाची दृढ भक्ति आणि स्थिरबुद्धि निरंतर असलेली स्पष्ट दिसते. तसेंच आदिकविश्रेष्ठ वाल्मीकीनें " रुद्रः स विष्णुरिव " [ तो रुद्र विष्णूप्रमाणें दिसतो ] अशी जी उपमोक्ति सांगितली, या उपमोक्तीनें वाल्मीकीची स्वतःची परतत्वाचे ठायीं [ शिवावर ] दृढ भक्ति दाखविली. ( १०६ ) वास्तविक ज्यावेळेस राम सिंहासनारूढ झाला, तेव्हां जवळ सीता आणि बाजूला लक्ष्मण होता, त्या अभिषेकाच्या समयीं खरोखरीच पार्वतीसहित शिव परब्रह्मवस्तूच सिंहासनावर विराजमान झाली आहे काय? असें क्षणभर भासूं लागलें असें झटलें. ( १०७ ) या उपमोक्तीवरून सर्व देवांपेक्षां शिवाचा महिमाच सर्वोत्कृष्ट आहे, शिवाव्यतिरिक्त दुसरी श्रेष्ठ वस्तु नाहींच असा आपला आशय कवीनें व्यक्त केला. आतां शिवच सर्व जगाचा शास्ता [ शिक्षा करणारा ] आहे, असें हें कवीचें तात्पर्य कांहीं हेतु

" संवत्सरं वरद वासयितुं प्रवृत्तः सीतां दशाननगृहे जगतां नियंतुः। संकल्प एव तव तद्वसतेरबोधे रामस्य हेतुरिति भावममुष्य मन्ये" ॥ १०९ ॥ सीतारामयोर्विप्रयोगं संवत्सरमनुवर्तयिषोरीश्वरस्य संकल्प एव रामस्य रावणवसतत्रबोधे हेतुर्वाल्मीकेराशयस्थित इत्येतत्कुतो ज्ञायत इत्याशंक्य अवश्यजिज्ञासितं रावणनिलयमेव रघुनाथेन सादरं पृष्टैस्तज्जानाद्भिरस्यैरपि जटायुकबंधसुग्रीवैरनुक्तत्वात् रामस्य तन्निलयावबोधे संवत्सरविप्रयोगानिर्वाहाच्चेति श्लोकद्वयेनाह ॥ ११० ॥ सीता-

---

देऊन व्यक्त करण्यासाठीं ग्रंथकर्ता ह्मणतो. ( १०८ ) हे वरदा शिवा, रावणाच्या घरीं एक वर्ष जी सीता राहिली, त्याला ( राहण्याला ) कारणही त्या जगन्नियंत्या ( जगाचा शास्ता ) शिवाचा संकल्पच होय. एक वर्षपर्यंत रावणाच्या घरीं सीता राहिली तरी रामाला कळूं नये ह्मणजे तुझ्या संकल्पावांचून दुसरें कारण कोणतें आहे? त्याला कारण तुझा संकल्पच आहे, असें मी खात्रीनें समजतों. ( १०९ ) सीतारामांच्या वियोगाला घडवून आणणाऱ्या ईश्वराचा संकल्पच रामाला सीतेचें ठिकाण न कळण्याचें कारण ह्मणून वाल्मीकीचा आशय होता, हें कशावरून? पुनः ग्रंथकर्ता ह्मणतो. रामानें आदरपूर्वक सुग्रीव, जटायु, कबंध इत्यादि जिवलग स्नेह्यांना रावणाचें घर कोठें आहे वगैरे प्रश्न केले, तरी त्यांनीं एक वर्षाची मुदत संपेपर्यंत रामाला सीतेचा पत्ता लागूं दिला नाहीं. त्याला कारण ह्मणजे त्यांनीं [ जटायू वगैरेनीं ] जर रावणाचें घर रामाला सांगितलें असतें तर एक वर्षपर्यंत सीतेचा वियोग रामाला झाला नसता; ह्मणून शिवसंकल्पाला अनुसरून त्या आप्तांनीं रामाला सीतेचें ठिकाण सांगितलें नाहीं असेंच गृहीत धरावें लागतें. असो, अशाच आशयाचे दोन श्लोक सांगतों. ( ११० ) जटायूनें स्वतः राव-

प्रहारमवलोक्य रघूत्तमाय ब्रूयुर्न जात्विति मुनिर्विदितत्वदाज्ञः। पृष्टो यदस्य रघुचंद्रमसा निवासमुक्त्वा गतः खगपतिः किं यदन्यदन्यत् ॥ १११ ॥ संसूच्य वक्ष्य इति नाह कबंध एतदज्ञानमभ्यनयदत्र च सूर्यसूनुः। उक्तं हि तत्र भगवन्न-निमित्तमन्यत्संकल्प एव भवतः शिव तस्य दृष्टिः ॥ ११२ ॥ ज्ञाते रिपुं रघुपतिर्लघु। संजिहीर्षेद्यः क्रोधतः समजिहीर्षदशेष-लोकान्। मोघो भवेच्छिव तदा निहते रिपौ ते संकल्प एव न हते तु तदीयबाणः ॥ ११३ ॥ जटायुसमागमे तावदेवं प्र-

---

णानें सीता नेली, हें प्रत्यक्ष पाहूनही परशिवाचा संकल्प जाणून रामाला ती गोष्ट न सांगतां मौन धरिलें. पुनः रामानें त्याला [ जटायूला ] सीते विषयीं प्रश्न केला, तथापि जटायूनें ती रावणाच्या घरांत आहे अशी सूचना करून देह सोडिला. परंतु रावणाच्या घराचा पत्ता कांहीं सांगितला नाहीं. या जटायूच्या अनुक्तीला [ न सांगण्याला ] कारण तरी शिवसंल्पाशिवाय दुसरें संभवत नाहीं. ( १११ ) कबंधानें सुद्धां नुसती सूचना करून देह सोडिला. पुनः सूर्याचा मुलगा सुग्रीव, त्याला रामानें प्रश्न केला तेव्हां त्यानेंही कांहीं स्पष्ट सांगितलें नाहीं. ह्यावरून हे भगवान् शंकरा, याला काय ह्मणावें ? शिवसंकल्पाशिवाय दुसरी सबब कांहीं दिसत नाहीं. ( ११२ ) तसेंच जेव्हां रामाला सीतेचें वर्तमान पक्कें समजलें, तेव्हां रावणाला मारिलें असतां ब्रह्महत्या लागेल ही भीति न धरितां संतापानें अंध होऊन त्यानें रावणाला तत्क्षणींच मारून टाकिलें. ज्या प्रचंड पराक्रमी रावणानें सर्व लोकांना आपल्या बाहुबलानें जिंकलें होतें, तशा रावणाचा प्राण रामाच्या एका बाणानें जाणें ह्मणजे शिवसंकल्पच तसा होता असें ह्मणावें लागतें. ( ११३ ) रामाला जेव्हां जटायु भेटला, तेव्हां त्यांचीं परस्पर प्रश्नोत्तरें काय झालीं हा आता

श्रोत्तरे ॥ ११४ ॥ "जटायो यदि शक्नोषि वाक्यं व्याहरितुं पुनः । सीतामाख्याहि भद्रं ते वधमाख्याहि चात्मनः ॥ ११५ ॥ किं निमित्तं हरेत्सीतां रावणस्तस्य किं मया । अपराद्धं तु यदृष्ट्वा रावणेन हृता प्रिया ॥ ११६ । कथं तच्चंद्रसंकाशं मुखमासीन्मनोहरम् । सीतया कानि चोक्तानि तस्मिन् काले द्विजोत्तम ॥ ११७ ॥ कथंवीर्यः कथंरूपः किंकर्मा स च राक्षसः । क्व चास्य भवनं तात ब्रूहि मे परिपृच्छतः ॥ ११८ ॥ तमुदीक्ष्याथ दीनात्मा विलपंतमनाथवत् ।

---

रामायणांतला कथाभाग सांगतात. ( ११४ ) काका जटायो, तुझी वाचा अजून स्पष्ट आहे तर माझी सीता कोठें गेली हें सांग. आणि तुला ही जी मरणावस्था आली आहे, याला काय कारण झालें? तें ही सांग ( ११५ ) रावणानें सीतेचा अपहार काय ह्मणून केला? मीं त्याचा असा अपराध तरी काय केला होता? त्यानें माझा असा कोणता अपराध पाहिला? काका काय सांगूं, ( ११६ ) चंद्राप्रमाणें सुंदर असलेलें तें सीतेचें मुख मज अभाग्याच्या दृष्टीस पुनः कसें पडणार? काका, सीतेनें जातांना त्या वेळेस काय सांगितलें तें तरी सांग. ( ११७ ) काका, तो राक्षस कसा आहे? व त्याचा चेहरा कसा आहे त्याचा पराक्रम कसा आहे, तो काय करितो, त्याचें घर कोठें आहे वगैरे लवकर मला काय तें सांग. ( ११८ ) तेव्हां कण्हत पडलेल्या जटायूनें अजाणत्या मनुष्याप्रमाणें रडणाऱ्या रामाला पाहून फार खोल गेलेल्या स्वरानें हळूं हळूं बोलण्यास सुरवात केली. [ ११९ ] बा वत्सा, रामा, रावण नांवाच्या त्या दुष्ट राक्षसानें अद्भुत माया रचिली, तिचें वर्णन मी काय करूं! पहा! त्यानें प्रथमतः मायेला निर्माण केल्याबरोबर जो सोसाट्याचा वारा सुटला त्याचें वर्णन माझ्यानें करवत नाहीं,

वाचाऽतिसम्भ्रया रामं जटायुरिदमब्रवीत् ॥ ११९ ॥ सा हृता राक्षसेंद्रेण रावणेन विहायसा । मायामास्थाय विपुलां वातदुर्दिनसंकुलाम् ॥ १२० ॥ परिश्रांतस्य मे तात पक्षौ छित्वा च राक्षसः । सीतामादाय वैदेहीं प्रयातो दक्षिणां दिशम् ॥ १२१ ॥ उपरुध्यंति मे प्राणा दृष्टिर्भ्रमति राघव । पश्यामि वृक्षान् सौवर्णानुशीरकृतमूर्धजान् ॥ १२२ ॥ येन याति मुहूर्तेन सीतामादाय रावणः । विप्रणष्टं धनं क्षिप्रं तत्स्वामी प्रतिपद्यते ॥ १२३ ॥ विंदो नाम मुहूर्तोऽयं स च काकुस्थ

---

पुढें एकाएकीं आकाश मेघांनीं व्याप्त होऊन जिकडे तिकडे अंधकार पडला, व कांहींएक दिसेनासें झालें. तशा संधींत तो दुष्ट एकदम सीताबाईला खांद्यावर घेऊन पळूं लागला. (१२०) तेव्हां सहज म्यां तें पाहिलें. नंतर त्याच्या बरोबर लढाई केली, काय सांगूं! लढाई करून मी फार थकलों, असें पाहून त्या चांडाळानें माझे दोन्ही पंख तोडले. नंतर लगेच गडबड करून सीतेला घेऊन तो दक्षिण दिशेकडे पळाला. (१२१) आटपलें. आतां काय सांगूं? सांप्रत माझ्यानें तोंडावाटे एक अक्षर सुद्धां काढवत नाहीं, माझे पंचप्राण वर उचंबळून येतात, दृष्टि अंधक झाली, मला हीं समोरचीं झाडें सोन्याच्या रंगाप्रमाणें दिसतात व वाळा त्यावर केंसासारखा दिसतो, माझा अंतकाळ जवळ आला. (१२२) तथापि शेवटचे दोन शब्द सांगतों ऐक. त्या चांडाळ राक्षसानें ज्या वेळेस सीतेचा अपहार केला, ती वेळ सुदैवानें फार उत्तम होती, ह्मणजे त्या वेळेस विंद मुहूर्त होता, असें विद्वज्जन ह्मणतात. त्या विंद मुहूर्तावर वस्तु हरवली तर पुनः सांपडते, असें शास्त्रांत सांगितलें आहे. (१२३) तर हे काकुस्था, [ रामा ] हा विंद मुहूर्ताचा काल त्या दुष्टाला समजला नाहीं, ह्मणून बरें झालें. त्यामुळें लहान माशानें

नाबुधव । झषवद्बडिशं गृह्य क्षिप्रमेव विनश्यति ॥ १२४ ॥ न च त्वया व्यथा कार्या जनकस्य सुतां प्रति । वैदेह्या रंस्यसे क्षिप्रं हत्वा तं राक्षसं रणे ॥ १२५ ॥ असंमूढस्य गृध्रस्य रामं प्रत्यनुभाषतः । आस्यात्सुस्राव रुधिरं म्रियमाणस्य सामिषम् ॥ १२६ ॥ पुत्रो विश्रवसः साक्षाद्भ्राता वैश्रवणस्य च । इत्युक्त्वा दुर्लभान् प्राणान्मुमोच पतगेश्वरः ॥ १२७ ॥ ब्रूहि ब्रूहीति रामस्य ब्रुवाणस्य कृतांजलेः" इति ॥१२८॥ कबंधसमागमे तु "रावणेन हृता भार्या मम सीता यशस्विनी । निष्क्रांतस्य जनस्थानात्सह भ्रात्रा यथासुखम् ॥ १२९ ॥ नाममात्रं तु जानामि न रूपं तस्य रक्षसः । निवासं वा प्रभावं वा

---

मोठ्या माशाला खाल्लें तर तें त्याला न पचतां तो मरण पावतो, (१२४) तद्वत् तोही मरणार आहे, असो, आतां जानकीविषयीं तूं कांहीं काळजी करूं नकोस. लवकरच रावणाला मारून जानकीला परत आणून तूं सुखानें नांदशील. (१२५) याप्रमाणें शुद्धीवर असलेला जटायू रामाबरोबर बोलत असतां एकदम भडभड रक्त ओकला. (१२६) नंतर तो विश्रवस ऋषीचा मुलगा होय व त्याला साक्षात् कुबेराचा भाऊ ह्मणतात, असे उच्चार करीत करीत त्या जटायूनें प्राण सोडिला. (१२७) त्याच्या पुढें हात जोडून काका, काका, बोलरे बोल, असें ह्मणत सीतेविषयीं राम प्रश्न करूं लागला, तेव्हां जटायूच्या तोंडावाटे अक्षर निघेना, असें पाहून रामानें हळूच मग त्याच्याकडे न्याहाळून पाहिलें, तेव्हां जटायूचे प्राण गेले असें त्यास समजलें. (१२८) येथें रामाचा व जटायूचा संवाद संपला. आतां कबंधाच्या भेटीचे वेळीं राम कबंधास ह्मणतात. हे कबंधा, माझ्या भावाला बरोबर घेऊन सीतेसहित जनस्थानाहून मी जेव्हां निघालों, तेव्हां माझ्या सीतेला रावण नांवाच्या कोणीं दुष्ट राक्षसानें चोरून नेलें. (१२९)

क्षयं तस्य न विद्महे ॥ १३० ॥ शोकार्तानामनाथानामेवं विपरिधावताम् । कारुण्यं चेदृशं कर्तुमुपकारे च वर्तताम् ॥१३१॥ काष्ठान्यानीय शुष्काणि काले भग्नानि कुंजरैः । धक्ष्यामस्त्वां महाभाग श्वभ्रे महति कल्पिते ॥ १३२ ॥ स त्वं सीतां समाचक्ष्व यत्र वा येन वा हृता । कुरु कल्याणमत्यर्थं यदि जानासि तत्वतः " इति प्रश्नः । तत्र कबंधस्योत्तरम् ॥१३३॥ "दिव्यमास्ति न मे ज्ञानं न हि जानामि मैथिलीम् । यस्तां ज्ञास्यति तं वक्ष्ये दग्धः स्वं रूपमास्थितः ॥ १३४ ॥ अदग्धस्य हि

---

त्या राक्षसाचें नांव मात्र मला माहित आहे, त्याचें घर, त्याच्या प्रभाव, त्याचें वय वगैरे कांहीं ठाऊक नाहीं. ( १३० ) दुःखानें मी होरपळलेला आहें, शिवाय इकडच्या प्रदेशांत मी गैरमाहिती आहें, व तिच्याकरितां इकडे तिकडे विनाकारण पळापळी करीत आहें, अशा मज गरीबावर तूं हा उपकार कर कीं, ( १३१ ) ती कोठें आहे तें सांग, व त्या राक्षसाचा पत्ता सांग. ह्मणजे तुझे कांहीं उपकार मी ठेवणार नाहीं. आतांच्या आतां वाळलेलीं व हत्तीनें तोडून टाकलेलीं लांकडें आणून येथेंच वाहत असलेल्या ओढ्याच्या कांठावर चिता रचून तुझें दहनकर्म वगैरे सर्व करितों. ( १३२ ) तर तूं सीता कोठें आहे? तिला कोणीं नेलें, तें सांग. कबंधा, तुला माहीत असेल तर कांहींएक न ठेवतां सर्व हकीकत सांगून आमचें कल्याण कर. असें रामानें ह्मटल्यावर कबंध ह्मणाला. ( १३३ ) रामा, मला कांहीं दिव्य [ अपरोक्ष ] ज्ञान नाहीं, ह्मणून मी स्वतः जानकी कोठें आहे हें जाणूं शकत नाहीं, तूं एवढें कर कीं, येथें चिता रचून माझें प्रेत जाळून टाक, ह्मणजे माझें पूर्वीचें स्वरूप मला प्राप्त होईल, मग मी सीतेला ज्यानें नेलें त्याची माहिती असणाऱ्याचें नांव सांगेन. ( १३४ ) हे प्रभो रामा, मला न जाळतां अशाच स्थितींत

विज्ञातुं शक्तिरस्ति न मे प्रभो। राक्षसं तं महावीर्यं सीता येन हृता तव ॥१३५॥ विज्ञानं हि महद्भ्रष्टं शापदोषेण राघव। स्वकृतेन मया प्राप्तं रूपं लोकविगर्हितम् ॥ १३६ ॥ किंतु यावन्नयात्यस्तं सविता श्रांतवाहनः । तावन्मामवटे क्षिप्त्वा दह राम यथाविधि ॥ १३७ ॥ दग्धस्त्वयाहमवटे न्यायेन रघुनंदन। वक्ष्यामि तं महावीर यस्तं ज्ञास्यति राक्षसम् ॥१३८॥ तेन सख्यं च कर्तव्यं न्यायवृत्तेन राघव । कल्पयिष्यति ते वीर साहाय्यं लघुविक्रमः ॥ १३९ ॥ नहि तस्य त्वविज्ञातं त्रिषु लोकेषु राघव। सर्वान् परिसृतो लोकान् पुरा वै का-

---

त्या प्राण्याचें नांव सांगण्याचें सामर्थ्य माझ्या ठिकाणीं नाहीं. ज्या राक्षसानें तुझी सीता नेली, त्याचें नांव सांगण्या इतकें अपरोक्षज्ञान ही मजमध्यें नाहीं. ( १३५ ) आतां तूं ह्मणशील कीं, तूं मोठा ज्ञानी असून माझ्याशीं कपट करितोस, तर हे रामा, खरोखरीच तुझ्याशीं मी कपट करीत नाहीं. माझ्याच दुष्ट कृत्यानें मला शाप होऊन म्यां तें ज्ञान घालवून घेतलें, आणि ज्या माझ्या सध्याच्या स्वरूपाला सगळे लोक निंदा करितात, अशा ह्या अतिशयित निंद्य स्वरूपाला मी येऊन पोहोंचलों. ( १३६ ) आतां तूं असें कर कीं, ज्याचे घोडे पळून पळून दमले आहेत, असा हा सूर्यनारायण जोंपर्यंत अस्ताला गेला नाहीं, तोंपर्यंत लांकडें जमवून चिता रचून शास्त्रोक्त विधानानें तूं मला जाळून टाक. ( १३७ ) ह्याप्रमाणें त्वां माझें अंत्यकर्म केलें असतां मग तुझ्या सीतेला ज्यानें नेलें, त्या राक्षसाला जाणणाऱ्या प्राण्याचें नांव सांगतों. ( १३८ ) मग रामा त्याच्याशीं तूं न्यायानें सख्य कर, ह्मणजे ज्याचा पराक्रम फार तीव्र आहे, असा तो पुरुष तुला सर्व प्रकारचें सहाय्य करील. ( १३९ ) हे रघुनंदना, त्रैलोक्यांत झालेली कोणतीही बातमी असो, त्याला

रणांतरे" इति ॥ १४० ॥ ततो राक्षसदेहदाहानंतरं शापमुक्तेन प्राचीनं निजस्वरूपमास्थाय विमानमधिरुह्यगतेन तेन ॥ १४१ ॥ "श्रूयतां राम वक्ष्यामि सुग्रीवो नाम वानरः" इत्युपक्रम्य तस्य चरित्रमप्युपन्यस्य ॥ १४२ ॥ स ते सहायो मित्रं च सीतायाः परिमार्गणे । भविष्यति हि ते राम मा च शोके मनः कृथाः ॥ १४३ ॥ भवितव्यं हि यच्चापि न तच्छक्यमिहान्यथा । कर्तुमिक्ष्वाकुशार्दूल कालो हि दुरतिक्रमः ॥ १४४ ॥ गच्छ शीघ्रमितो वीर सुग्रीवं तं महाबलम् । वयस्यं तं कुरु क्षिप्रमितो गत्वाऽद्य राघव" ॥ १४५ ॥ इत्यादीनि

---

माहीत नाहीं अशी गोष्ट व्हावयाचीच नाहीं; इतका तो चतुर आहे. याला कारण ह्मणजे पूर्वीं कांहीं कारणामुळें त्यानें सर्व देश हिंडून पाहिलेला आहे. ( १४० ) इतकें झाल्यावर रामानें कबंधाचें अंत्यकर्म केलें. [ जाळलें ] मग कबंधाला पूर्वींचें उत्तम निजस्वरूप प्राप्त झालें. नंतर तो सुंदर विमानांत बसून रामाशीं पुनः बोलूं लागला. ( १४१ ) हे रामा, आतां मी तुला सर्व सांगतों ऐक. तूं येथून असाच समोरच्या रस्त्यानें जा. तेथें एक पर्वत तुला आढळेल; त्या पर्वतावर चौघां वानरांसहित सुग्रीवं नांवाचा वानर बसला आहे, त्याचें चरित्र सांगून पुनः कबंध बोलतो. ( १४२ ) तो वानर तुला सहाय्य करील, आणि तुझा परम मित्र होईल, नंतर सीतेचा तुला शोध लाऊन देईल. आतां तूं विनाकारण शोक करूं नकोस ( १४३ ) बाबा, होणारें जें आपल्या कपाळांत लिहिलें असेल, तें अन्यथा करावयाला [ चुकवायाला ] जगांत आजपर्यंत कोणी तरी समर्थ झाला आहे काय? काळ हा फार दुस्तर आहे, असें जाणून मनुष्यानें वागलें पाहिजे. ( १४४ ) आतां लौकर तूं येथून जा, आणि त्या बलिष्ठ सुग्रीवाशीं होतां होईल तितक्या लवकर

चोक्त्वा.। " स हि स्थानानि सर्वाणि कात्स्न्येंन कपिपुंगवः न तस्याविदितं लोके किंचिदस्ति हि राघव । यावत्सूर्यः प्रतपति सहस्रांशुररिंदम" इति प्रागुक्तार्थ एवानुदितः ॥१४६॥ सुग्रीवसमागमे तु ॥१४७॥ "क वा वसति तद्रक्षो महद्दून्यसनदं मम । यन्निमित्तमहं सर्वान्मारयिष्यामि राक्षसान् ॥१४८॥ हरता मैथिलीं येन मां च रोषयता भृशम् । आत्मना जीवितांताय मृत्युद्वारमपावृतम्" इति प्रश्नः । ततः सुग्रीवस्य प्रत्युत्तरम् ॥१४९॥ "न जाने निलयं तस्य सर्वथा पापरक्षसः।

---

सख्य कर. (१४५) [ येथपर्यंत कथाभाग सांगून ] "न हि स्थानानि सर्वाणि कात्स्न्येंन मुनिपुंगवाः । न तस्याविदितं लोके किंचिदस्ति हि राघव । यावत्सूर्यः प्रतपति सहस्रांशुररिंदम" इत्यादि कथाभाग पूर्वी एकदां सांगितला आहे, ह्मणून पुनः सांगितला नाहीं. (१४६ )असो. रामाचा व सुग्रीवाचा समागम जेव्हां झाला, तेव्हां काय कथाभाग झाला, तो सांगतात. प्रथम राम सुग्रीवाला ह्मणतात, (१४७) बा सुग्रीवा, मला अतिशय दुःख देणारा तो राक्षस कोठें राहतो ? तें सांग. ह्मणजे राक्षस कुळालाच नाहींसें करून टाकतों. कारण ज्या राक्षसाकरितां मी इतक्या दुःखामध्यें पडलों, त्या राक्षसाला आणि त्याच्या कुळाला जगांत जिवंत ठेवणें तरी योग्य आहे काय ? (१४८) पहा जानकीचा अपहार करून त्यानें मला किती दुःख दिलें ? जानकीच्या वियोगानें मला अतोनात त्रास झाला. ह्यामुळें त्या राक्षसानें आपण होऊनच आपल्या मृत्यूचें दार उघडून घेतल्याप्रमाणें केलें नाहीं काय ? असें रामानें ह्मटल्यावर सुग्रीव ह्मणतो. (१४९) मित्रा रामा, त्या पापी राक्षसाचें घर मला मुळींच ठाऊक नाहीं, आणि त्याचें सामर्थ्य कितपत आहे व तो किती पराक्रमी आहे वगैरे त्या दुष्टाचा वृत्तांत मला कांहीं

सामर्थ्यं विक्रमं वाऽपि दौष्कुलेयस्य वा कुलम्" इति ॥१९०॥
इह जटायुर्बाह्याभ्यंतराचिन्हैः क्षणांतरेऽपि स्वस्य जीवनानुवृत्ते-र्दौर्लभ्यं संभावयन् व्याहरणशक्तिकाल एव रावणवधे त्वरितस्य श्रीरामचंद्रस्य प्रश्नविषयेषु अवश्यजिज्ञासितरावणनिलयप्रश्नस्यैव प्रथममुत्तरं वक्तव्यमिति स्वयमेव ज्ञातुं शक्तोऽपि तद्वक्तुमिवोपक्रम्य तदपृष्टं दर्शनादिकमन्यदन्यदेवाह ॥१९१॥
ततो विश्रांतिसमये "पुत्रो विश्रवसः साक्षाद् भ्राता वैश्रवणस्य च" इत्येतावदेवोक्त्वा इतःपरं रावणनिलयवचनं प्राप्तकालमासीदिति चिंतयत्यपि राघवे दिष्टं गतः ॥ १९२ ॥
कबंधोऽपि सीतां रावणनिलयं च पृष्टः प्राग्दिव्यरूपेण संचारकाले सकलदेवगंधर्वादिप्रसिद्धं रावणं जानन् तद्विभावनाय विशेषतो नाभिजानामि मैथिलीमित्युक्त्वा रावणं तु जाना-

---

माहीत नाहीं. इतकें सुग्रीवाचें भाषण सांगून नंतर ग्रंथकार ह्मणतो. (१९०) जटायूनें आपण खास मरणार हें तर ओळखलेंच. तथापि तशा संधींत रावणाला मारण्यास उतावीळ झालेल्या रामानें जटायूला अनेक प्रश्न केले, त्यांत रावण कोठें राहतो? त्याचें घर कोठें आहे? वगैरे त्यांतील अवश्यक प्रश्नांना अगोदर उत्तर द्यावें असें जटायू जाणत होता, तरी तें आधीं न सांगतां रामानें न विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर "मी त्याला पाहिलें" वगैरे दुसराच विषय मध्यंतरीं सांगितला. (१९१) मग अगदीं घाईच्या वेळेस "तो रावण विश्रव्याचा मुलगा होय, तो कुबेराचा भाऊ" वगैरे हकीकत सांगतां सांगतां मध्यें राम, रावणाचें घर कोठें आहे असा प्रश्न करितो न करितो इतक्यांत जटायूनें आपला प्राण सोडिला. (१९२) तसेंच कबंधालाही रामानें सीतेविषयीं व रावणाच्या घराविषयीं प्रश्न केला, तेव्हां कबंध हा शापमुक्त होऊन विमानांत बसून जात असतां सर्व देवगंधर्वामध्यें प्रख्यातीस

मीति विभावयन् " अदग्धस्य हि विज्ञातुं शक्तिरास्ति न प्र
भो । राक्षसं तं महावीर्यं सीता येन हृता तव । विज्ञानं हि
महद्भ्रष्टं शापदोषेण राघव । " इत्युक्तिभंग्या दहनेन शाप-
मोक्षं पूर्वविज्ञानं च प्राप्य तदनंतरं रावणं तन्निलयं च वक्ष्या-
मीति सूचयित्वा पुनस्तदैव । " वक्ष्यामि तं महावीर यस्तं
ज्ञास्यति राक्षसं " इति स्वयं रावणं न वक्ष्यामि तद्ज्ञातारमन्यं
वक्ष्यामीति पूर्वसूचितार्थमुक्त्वा सुग्रीवमेव तद्ज्ञातारं तेन यत्र
क्वचिन्निवेशितायाः सीताया मार्गणे समर्थं च सामान्यतो वि-
शेषतश्च प्रपंचेन जगाद ॥ १५३ ॥ सुग्रीवस्तु पृष्टः सर्वप्र-
कारेणापि रावणं तन्निलयं च जानन्नेव कथमपि न जाना-
मीति ज्ञानमपललाप । स जानातीत्येतच्च कबंधवचनैः सुविदित-

---

आलेल्या रावणाला जाणत असूनही त्या रामाला जणूं आपला
विश्वास दाखविण्याकरितां विशेषें करून सीतेला मी जाणत नाहीं,
साधारणपणें रावणाला जाणतों, असें सांगून " अदग्धस्य " या
श्लोकापासून " तद्ज्ञातारं वक्ष्यामीति " या वाक्यापर्यंत पूर्वीं वर्णन
केल्याप्रमाणें सुग्रीव रावणाला जाणतो, त्याच्याकडे तूं जा, असें
सांगून कबंध तेथून निघून गेला. ( १५३ ) आतां रामानें प्रश्न
केल्याप्रमाणें सुग्रीवाला रावणाची एकंदर माहिती असूनही मला
कांहीं ठाऊक नाहीं, असा सुग्रीवानें खोटा मजकूर सांगितला. बरें,
सुग्रीवाला रावणाची माहिती होती कशावरून ? अशी कोणी शंका
घेईल तर सांगतों. कबंधानें पूर्वीं रामाला सुग्रीवाची हकीकत क-
ळविली होती, त्यावरून सुग्रीवाला रावणाची माहिती होती, असें
सिद्ध होत नाहीं काय ? असें असूनही पुढें सीतेच्या शोधाक-
रितां सुग्रीवानें जेव्हां वानरांना चारी दिशेकडे पाठविलें, तेव्हां
त्यानें पर्वत, गुहा, वेली, नद्या, गुल्म, अशीं शोधावयाचीं स्थळें
सांगून रावण वास्तविक कोठें राहत होता, तें स्थळ मात्र त्या

थैव । चतसृष्वपि दिक्षु मार्गितव्यान् पुरागिरिसागरादीनुपदिश्य “ अभास्करममर्यादं न जानीमस्ततः परं ” इति तद्वचनेन च विदितं ॥ १५४ ॥ उत्तररामायणे हि सुग्रीवस्य रावणतत्प्रभावताग्निलयादिदृढपरिज्ञानसद्भावः स्पष्टीकृतः। तत्र हि अगस्त्येन रघुनाथं प्रति वालिना बलात् गृहीत्वा किष्किधाभ्याशं नीतस्य रावणस्य वालिना सहाग्निसाक्षिकसख्यप्राप्तिमुक्त्वा ह्युक्तं ॥ १५५ ॥ “ अन्योन्यलंबितकरौ ततस्तौ हरिराक्षसौ। किष्किधां विशतो हृष्टौ सिंहौ गिरिगुहामिव ॥१५६॥ स तत्र श्रुषितो मासं सुग्रीव इव राक्षसः । अमात्यैरागतैर्नीतस्त्रिलोक्युत्सादनार्थिभिः ॥१५७॥ एवमेतत्पुरावृत्तं वालिना रावणः प्रभो । धर्षितश्च कृतश्चापि भ्राता पावकसन्निधौ ” इति

---

वानरांना सांगितलें नाहीं. ह्यावरून मुद्दाम रावणाची माहिती दिली नाहीं असें ठरतें असो. ( १९४ ) आतां दुसरीकडे ह्मणजे उत्तररामायणांत सुद्धां सुग्रीवाला रावणाच्या घराची वगैरेची मांहिती चांगली होती, असें वर्णन केलें आहे, तो कथाभाग सांगतों. उत्तररामायणांत असें वर्णन केलें आहे कीं ? “ अगस्त्यऋषीनें रामाला म्हटलें, रामा, पूर्वीं वालीनें बलात्कारानें रावणाला बांधून किष्किधेपर्यंत आणून तेथें अग्नीपुढें शपथ करवून त्याच्याशीं सख्य केलें. ( १९९ ) नंतर दोघेही एकमेकांच्या खांद्यावर हात टाकून सिंह जसे गिरिगुहेंत शिरावे, तसे वाली आणि रावण किष्किधा राजधानींत आनंदानें शिरले. (१९६) नंतर तेथें रावण एक महिनापर्यंत सुद्धां न राहतां सुग्रीव जसा पळाला, त्याप्रमाणें त्रैलोक्य जिंकणाऱ्या आपल्या मंत्र्याबरोबर पळून गेला. ( १९७ ) हे प्रभो रामा, याप्रमाणें पूर्वीं वालीनें रावणाचा पराभव करून अग्नीच्या साक्षीनें त्याशीं सख्य करून त्यास आपल्या भावाप्रमाणें

॥ १९८ ॥ एवं युवराजः सुग्रीव इव वालिनो बहुमानपात्रं तया मासमात्रं सह स्थितः । ततस्त्रैलोक्यविजयार्थममात्यैर्नीतश्च तस्य स्थानविक्रमादिकं सुग्रीवो न जानातीत्येतदत्यंतासंभावितमेव । तेन सर्वथा न जानामि किंचिज्जानामीत्यर्थ इति शंकापि निरस्ता ॥ १९९ ॥ अतिसौहृदेन परिचये सर्वप्रकारेणापि ज्ञानस्यावश्यंभावात् तदर्थकल्पनेऽपि यावज्जानाति तावतस्तदेव वक्तव्यत्वापत्तेश्च । यत्तु हनुमदादीन् दक्षिणसमुद्रं प्रेषयता दक्षिणस्यां दिशि सीतान्वेषणाय तत्रत्यान्वेषणीयस्थानान्युपदिशता लंकामतीत्य स्थितं भोगवत्यादिकं वदताऽपि विशिष्य लंका नोक्ता तत्प्राकृक्तस्वज्ञानापलापनिर्वाहाय

---

मानिलें. (१९८) वालीनें आपल्या खासगत बंधूप्रमाणें [ युवराज सुग्रीवाप्रमाणें ] रावणाचा मान ठेविला होता, तो रावण तेथें एक महिना राहून मग त्रैलोक्याला जिंकण्याकरितां ह्मणून आपल्या मंत्र्याबरोबर निघून गेला. अशी ही पूर्वीची हकीकत असतांना सुग्रीवाला रावणाची माहितीच नाहीं असें ह्मणणें कधींही संभवणार नाहीं. ह्यावरून सुग्रीवानें मला कांहीं ठाऊक नाहीं असें जें ह्मटलें तें सर्वथैव खोटें होतें, कांतर रावणाची मला माहिती नाहीं असें ह्मणण्यास त्यास जागाच नव्हती. (१९९) कारण, ज्याअर्थीं वालीचें रावणाशीं फार सख्य होतें त्याअर्थीं सुग्रीवाला रावणाची एकंदर माहिती अवश्य असली पाहिजे होती, हें उघड होतें, तर जितकें त्याला माहित होतें, तितकें तरी त्यानें सांगावयाला पाहिजे होतें. शिवाय सीतेच्या शोधाकरितां हनुमान् वगैरे वानरांना जेव्हां दक्षिण दिशेकडे पाठविलें, तेव्हां लंकेच्या पलीकडे असलेलें भोगवतीपुर तपासण्यास त्या वानरांना सुग्रीवानें सांगितलें, परंतु जवळ असलेली लंका कांहीं तपासण्यास सांगितली

॥१६०॥ चतसृष्वपि दिक्षु सीतान्वेषणार्थमप्रसिद्धान्यपि स्थानान्युपन्यस्यन् अतिप्रसिद्धां लंकां न जानातीत्यसंतासंभावितमेतत् । अतएव उक्तापलापनिर्वाहाय वालिसामर्थ्यं रामेण पृष्टः सुग्रीवः सर्वविधमपि वालिनः पराक्रमं प्रपंचेन वर्णयन्नपि वालिना गृहीत्वा किष्किधां नीत इत्यमुमंशं नोक्तवान्। एवं सर्वात्मना स्वस्य रावणानिलयादि ज्ञानं गूहमानोऽपि दक्षिणस्यां दिशि हनुमदादिप्रेषणसमये इदानीमपि गूहिते मित्रकार्यं न सिध्येदिति स्वज्ञानमाविश्चकार । तत्र हि दक्षिणसमुद्रवर्णनानंतरमुक्तं ॥ १६१ ॥ " द्वीपस्तस्य परे पारे शतयोजनविस्तृतः । अगम्यो मानुषैर्दीप्तस्तं मार्गध्वं समंततः

---

नाहीं. ह्याचें कारण ह्मणजे पूर्वी रामाला " कांहीं ठाऊक नाहीं " ह्मणून सांगितलें होतें, तर आतां कशी माहिती द्यावी ? " अशा शंकेनें त्यानें आपली माहिती त्यावेळीं सुद्धां दिली नाहीं. ( १६० ) चारी दिशेस सीतेच्या शोधाकरितां वानरांना पाठविणाऱ्या सुग्रीवानें जगांत ज्यांची प्रसिद्धी नाहीं, अशी स्थानें सुद्धां तपासण्यास सांगितली, तेव्हां सुप्रसिद्ध लंका माहीत नाहीं, असें ह्मणणें संभवेल तरी कसें ! ह्मणूनच आपली माहिती न कळविण्याकरितांच रामापुढें वालीच्या एकंदर पराक्रमांचें वर्णन जसें केलें, तसें रावणाला बलात्कारानें वालीनें आणिलें होतें वगैरे वृत्तांत त्यानें सांगितला नाहीं. ह्याप्रमाणें सर्वांशीं आपली माहिती न सांगतां सुग्रीवानें दक्षिणेस मारुती वगैरे वानरांना पाठवितेवेळेस आजपर्यंत झांकून ठेविलेली गोष्ट आतां झांकली असतां मित्राचें काम होणार नाहीं हें मनांत आणून तेव्हां मात्र दक्षिण समुद्राचें वर्णन केल्यानंतर सांगितलें कीं, ( १६१ ) वानरांनो, समुद्राच्या पलीकडच्या कांठांवर तुह्मांला चारशें कोसपर्यंत एक बेट लागेल, त्या

॥ १६२ ॥ तत्र सर्वात्मना सीता मार्गितव्या विशेषतः । स हि देशस्तु वध्यस्य रावणस्य दुरात्मनः । राक्षसाधिपतेर्वासः सहस्राक्षसमद्युतेः" इति ॥ १६३ ॥ अत्र पूर्वं स्वज्ञानं गूहितमिति व्रीडया रावणवासस्य लंकेति नाममात्रं नोक्तं एवं च यत् गृध्रराजः स्वयं दशरथस्थानीयोऽपि प्रथमवक्तव्यं व्याहरणशक्तिकाले नावदत् यच्च कबंधसुग्रीवौ कृतकरिष्यमाण महोपकारौ तन्नावदतां ॥ १६४ ॥ तत्र दृष्टः कश्चन हेतुरस्ति चेत्काविनाऽवश्यमुच्येत् तदनुक्त्या तदभावं निश्चिस परमेश्वरसंकल्प एव तत्र हेतुर्विवक्षित इति सहृदयाः स्वयमेव ज्ञास्यं-

---

बेटांत मनुष्यसंचार वगैरे नाहीं, तेथें चोहोंबाजूंस सीतेचा शोध करा. ( १६२ ) तेथें विशेषेंकरून सीतेचा तपास करा. कारण मारण्यास योग्य अशा त्या दुष्ट रावणाचा तो देश आहे, आणि ज्याच्या तेजापुढें इंद्राचें तेज तुच्छ वाटतें, अशा रावणाचें घर सुद्धां तेथें आहे. ( १६३ ) ह्याप्रमाणें रावणाची माहिती देणाऱ्या सुग्रीवानें ह्यावेळेला सुद्धां खोटें बोलल्याचा आरोप येईल ह्मणून लाजेनें "लंका" असें नांव न घेतां नुसत्या एका द्वीपाचें वर्णन केलें. एकंदरींत त्यानें कांहीं सांगितलें नाहीं. जटायू हा रामाच्या वडिलाच्या ठिकाणीं मानिला गेला होता, तरी त्यानें रावणाचा पत्ता सांगितला नाहीं. सुग्रीव व कबंध या दोघांपैकीं कबंधावर रामानें उपकार केला होता, आणि सुग्रीवाला राज्याभिषेक करून त्यावर उपकार करावयाचा होता, असें असून त्या दोघांनींही रावणाचा पत्ता सांगितला नाहीं. ( १६४ ) ह्यावरून कवीचा आशय काय निघतो ? तर त्या तिघांनीं ज्याअर्थीं रावणाची हकीकत कळविली नाहीं, त्याअर्थीं शिवसंकल्पच ती हकीकत रामाला न कळविण्याला कारण आहे असें रसिक विद्वान लोक निश्चयानें कबूल करितील, अशा अभिप्रायानें जटायु, कबंध व सुग्रीव ह्या

सीसंभिंमेत्स तेषामवचनमात्रं कविर्निवबंधेति निश्चीयते ॥१६५॥ न च तेषां रावणनिलयादीनामधिगमेऽपि सेतुबंधादिकार्येषु सहायान्वेषणार्थं कालविलंबो भवेदिति तत एवान्यथासिद्धेः कथं तेषामवचनं परमेश्वरसंकल्पैकायत्तं सहृदया निश्चिनुयुरिति शंकनीयम् ॥ १६६ ॥ एतच्छंकावारणार्थमेव कविना जनस्थाने सीतामन्वेषमाणस्य रामस्य तेन गंधर्वादिषु सीतां

---

तिघांचीं वचनें मात्र कवीनें आपल्या निबंधांत लिहिलीं आहेत. ( १६५ ) आतां येथें कदाचित् कोणी अशी शंका घेतील कीं, जटायु, कबंध व सुग्रीव या तिघांनीं रावणाची हकीकत रामाला कळविली नाहीं, इतक्यावरून विद्वान् लोक हकीकत न कळविण्याला शिवसंकल्पच मुख्य कारण आहे आणि शिवसंकल्पामुळें एक वर्षपर्यंत काल गेला, असा निश्चय करतील ह्मणून कवीनें नुसतें त्या तिघांनें वाक्य मात्र आपल्या निबंधांत दिलें असें सांगितलें. तर येथें आह्मी ( शंकाकार ) असें ह्मणतों कीं, शिवसंकल्पच न सांगण्याला कारण आहे असाच निश्चय विद्वान् लोकांनीं कां करावा? कारण दुसरें असें कीं, रामानें लंकेला येण्याकरितां जेव्हां सेतु बांधावयास आरंभ करविला, तेव्हां त्या सेतूच्या बांधकामाकरितां आणि सेतु बांधणा या लोकांच्या शोधाकरितां मध्यें जो काळ गेला, तोच काल एक वर्षपर्यंत गेला, असें कां ह्मणूं नये ? आणि शिवसंकल्पच कालविलंबाला कारण होता असें विद्वानांनीं कां ह्मणावें ? त्यावर ग्रंथकार उत्तर देतात. ( १६६ ) बाबानो, या तुमच्या शंकेच्या निवारणाकरितांच वाल्मीकीनें पुढें सांगितल्याप्रमाणें वर्णन केलें आहे, तें पहा. " राम जनस्थानांत असतांना सीता कोठें गेली, ह्मणून तिच्या शोधासाठीं जेव्हां इकडे तिकडे तो हिंडूं लागला, आणि शोध करून जेव्हां दमला, तेव्हां गंधर्व वगैरे उंच प्रदेशांतले लोक तरी आपल्या जानकीचा तपास लाऊन देतील.

कोऽपि न प्रदर्शयंति न प्रयच्छंति चेति महता क्रोधेन कृत्स्नस्यापि त्रैलोक्यस्य खिलीकरणार्थं शरसंधानपर्यंतं व्यापारमुक्त्वा ततो लक्ष्मणकृतेन प्रसादनेन ॥ १६७ ॥ "एकस्य नापराधेन लोकान् हंतुं त्व मर्हसि" इत्युक्त्या तस्य ततो निवृत्तिरुक्ता ॥ १६८ ॥ अनेनाकर्णितेन सहृदयाः श्रीरामो रावणवधे सहकार्यंतरं नेच्छेदिसन्नगमादुक्तशंकारहिताः संतः तेषामवश्यवचननिरोधे परमेश्वरसंकल्पमेव हेतुं विवक्षितं ज्ञास्यं-

---

या आशेनें रामानें वर तोंड करून गंधर्वादिकांची प्रार्थना केली: तथापि कोणीही कांहीं सीतेच्या शोधाविषयीं हालचाल केली नाहीं आणि सीतेस कोणी दाखविलें नाहीं व तिचा पत्ताही सांगितला नाहीं तेव्हां संतापानें धनुष्य बाण हातांत घेऊन राम सगळ्या लोकांना मी आतांच्या आतां जाळून टाकितों, असें ह्मणून खरोखरीच लोक जाळण्याकरितां जेव्हां धनुष्याला त्यानें बाण लाविला तेव्हां विनयानें लक्ष्मण त्यास ह्मणूं लागला. (१६७) रामा, हें काय आरंभिलें आहे ? विचार करा कीं, एकाच्या अपराधाकरितां सर्व लोकांना शिक्षा देणें आपल्यासारख्या थोर गृहस्थांना उचित आहे काय ? हें लक्ष्मणाचें भाषण ऐकून राम स्वस्थ बसले. (१६८) हा कथाभाग वाचून रसिक विद्वान् लोक सेतु बांधण्यामध्यें रामाचा एक वर्ष काल व्यर्थ गेला, आणि या कालविलंबाला शिवसंकल्प कांहीं कारण नाहीं, असा निश्चय करतील ह्मणून जी शंका काढिली, त्या तुमच्या शंकेला आतां जागाच राहिली नाहीं. कारण असें कीं, आतां दिलेल्या वरच्या कथाभागावरून रावणाला मारण्याकरितां रामाला दुसऱ्याची जरूरच नव्हती, असें सिद्ध होतें; मग सेतु बांधविण्याकरितां काळ गेला असें ह्मणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ह्यावरून कवीचा अभिप्राय असा कीं, जटायु, कबंध व सुग्रीव या तीघांनीं शिवसंकल्पाला स्मरूनच रावणाचा पत्ता रामास

क्षीति ॥ १६९ ॥ अनेन साक्षान्नारायणस्यैव लक्ष्मीवियोगं चिरमनुवर्तयितुं कृतसंकल्पः परमेश्वरो नारायणादन्योऽभवत् पूर्वापरसंदर्भेषु नारायणादप्यधिकमहिमेति व्यंजितः शिव एव विवक्ष्यत इति ज्ञास्यंतीति कवेराशय इत्यर्थः ॥ १७० ॥ ननु परमेश्वरः किमर्थं रावणगृहे संवत्सरं सीतां वासयितुं संकल्पयामासेति चेद् उच्यते ॥ १७१ ॥ महता तपसा युक्तस्तपोवीर्यभ्रंशं कारयित्वा रघुनाथमुखेन हंतव्यः तत्तपोवीर्यभ्रंशश्च चिरं तत्र सीतावासनेनैव लभ्यते। तद्वासे हि तस्यां निरंतरं मोहितात्मा सर्वं तपस्त्यजेत् तदानीं रघुनाथेन हंतुं शक्यो भ-

---

सांगितला नाहीं, ह्मणूनच एक वर्ष काल फुकट गेला, आणि या कालविलंबाला शिवसंकल्पच कारण आहे, असा कवीचा अभिप्राय होय, आणि अर्थात रसिक विद्वज्जनही तोच अर्थ मान्य करितील हें उघड आहे. ( १६९ ) यावरून साक्षात् नारायणाचा आणि लक्ष्मीचा वियोग घडवून आणणारा नारायणावांचून दुसरा कोणी तरी परमेश्वर असला पाहिजे, असा तर्क निघतो, आणि कवीच्या निबंधांतल्या पूर्वापर संदर्भांवरून तो परमेश्वर नारायणापेक्षां अधिक माहात्म्याचा शिवच असला पाहिजे असा कवीचा आशय आहे, असें स्पष्टपणें सिद्ध होतें. ( १७० ) [ पुनः शंकाकार शंका करितो. ) कां हो ? तुमच्याच मताप्रमाणें शिवसंकल्पच कारण आहे असें घेऊन तुह्मांला मी विचारतों, शिवानें तरी रावणाच्या घरीं सीता एक वर्ष राहिली पाहिजे, असा संकल्प कां करावा, सांगा पाहूं ? ( १७१ ) [ ग्रंथकार उत्तर देतात ] बावा. सांगतों ऐक. रावण हा मोठा तपस्वी होता, आणि त्या तपश्चर्येचा भंग होण्यासाठीं महासाध्वी सीतेचा वास रावणाच्या घरीं होऊन तिच्या स्वरूपाला भुलून एक वर्षपर्यंत रावणानें तिचा छल करावा, मग तो रावण

यति नान्यथेत्येतदभिप्रायेणैव भगवता वाल्मीकिना जटायुर्वधानंतरम् ॥ १७२ ॥ "तां लतामिव वेष्टंतीमालिंगंतीं महाद्रुमान् । मुंच मुंचेति बहुशः प्रवदन् राक्षसेश्वरः ॥ १७३ ॥ क्रोशंतीं रामरामेति रामेण रहितां वने । जीवितांताय केशेषु जग्राहांतकसन्निभः " ॥ १७४ ॥ इति रावणेन प्रसह्य सीतायाः केशग्रहणं कृतमित्युक्त्वा । "दृष्ट्वा सीतां परामृष्टां दीनां दिव्येन चक्षुषा । कृतं कार्यमिति श्रीमान् व्याजहार पितामहः" ॥ १७५ ॥ इति तदानींतनकेशग्रहणानंतरमेव रावणवधेन देवकार्यं सिद्धम् ब्रह्मा निश्चिकायेत्युक्तं । यदा प्रथमं

---

हीनतपस्वी होईल नंतर रामाकडून त्याला मारवावें असें शिवाच्या मनांत होतें. आणि अशा रीतीनें रावणाचा तपोभंग केल्याशिवाय रामाला तो हार जाण्यासारखा नव्हता. ह्मणूनच जटायूनें देह सोडल्यानंतर वाल्मीकीनें आपल्या निबंधांत कसें वर्णन केलें तें पहा. (१७२) रावण जेव्हां आपल्या बरोबर येण्याकरितां सीतेवर बलात्कार करूं लागला, तेव्हां वेली जशी एखाद्या मोठ्या झाडाला चिकटावी, तद्वत् सीता मोठमोठ्या झाडांना चिकटूं लागली, आणि चांडाळा सोड सोड अशी ओरडावयाला लागली. (१७३) पुनः रामा रामा, धांवाहो धांवा असें मोठ्यानें आक्रोश करूं लागली. तेव्हां त्या रानांत रामाशिवाय तीं एकटी असलेली पाहून यमाप्रमाणें क्रूर भासणारा रावण तिला उचलून नेण्यासाठीं तिच्या वेणीला हात घालून ओढूं लागला. (१७४) ह्याप्रमाणें सीतेवर बलात्कार रावणानें केला, असें दाखऊन पुनः पुढचा कथाभाग सांगतात. दीन अनाथ सीतेवर रावणानें बलात्कार केलेला ब्रह्मदेवानें अंतर्दृष्टीनें पाहून "आतां आमचें कार्य झालें," असें ह्मटलें. (१७५) यांत विशेषेंकरून त्याचवेळेला [ जटायुमरणानंतरच्या बलात्काराच्या

पर्णशालायां केशग्रहणादि कृतं तदा स निश्चिकायेति नोक्तं तत्रापि केशग्रहणादिर्महान् मानभंग उक्तः ॥ १७६ ॥ " अभिगम्य प्रहृष्टात्मा राक्षसः काममोहितः। जग्राह रावणः सीतां ग्रहः खे रोहिणीमिव ॥ १७७ ॥ वामेन सीतां पद्माक्षीं मूर्धजेषु करेण सः। ऊर्वोस्तु दक्षिणेनैव परिजग्राह पाणिना " इति ॥ १७८ ॥ तदानीं ब्रह्मणो देवकार्यसिद्धिनिश्चयमनुक्त्वा जटायुवधानंतरं केशग्रहणं दृष्ट्वा तस्य तन्निश्चयमनुक्तवतः कवेराशयः ॥ १७९ ॥ यद्यप्याद्येन महता महिषीमानभंगेनैवा-

वेळेला ] " आतां रावण लौकर मरणार आणि आमचें कार्य निश्चयानें होणार, " असें ब्रह्मदेवानें ह्मटलें. पूर्वी जानकी झोंपडींत असतांना तिच्या वेणीस हात धरून रावणानें तिला ओढलें आणि त्या महासाध्वीचा त्या चांडाळ राक्षसानें अशा वाईट तऱ्हेनें मानभंग केला होता. तरी तेंव्हां ब्रह्मदेवानें " रावण मरणार, " असें ह्मटलें नव्हतें; आतां रावणानें जानकीचा अपमान कसा केला, हें पुढच्या रामायणांतल्या श्लोकांनीं वर्णन करितात. ( १७६ ) त्या दुष्ट राक्षसानें झोंपडींत असलेल्या सीतेला पाहून आनंदानें पुढें सरसावून विषयांध झाल्यामुळें सीतेला जसें एखाद्या दुष्ट ग्रहानें रोहिणी नक्षत्राला ग्रासावें तसें ग्रासिलें. [ तिचा अपहार करण्याविषयीं बुद्धि केली. ] ( १७७ ) नंतर डाव्या हातानें जानकीची वेणी धरून उजव्या हातानें तिच्या दोन्ही मांड्या धरून राक्षसानें जानकीला नेलें. ( १७८ ) [ ग्रंथकार ह्मणतो ] ह्या प्रमाणें जेव्हां रावणानें सीतेचा प्रथमतः अपमान केला, तेव्हां ब्रह्मदेवानें " रावण मरेल अर्थात् देवकार्य होईल " असा निश्चय केला नाहीं. ह्मणूनच कवीनें सुद्धां अशाच अर्थाचें वर्णन केलें आहे. [ कवीचा आशय असाच आहे, असें ग्रंथकार ह्मणतो ] १७९ ) यद्यपि पूर्वी झोंपडींत केलेल्या मानभंगानें संतप्त हो-

तिक्कुद्धस्य रामचंद्रस्य रावणजिघांसा भवेत् तथापि तपोबल-समन्वितस्य तस्य सीतायास्तद्गृहे वासेनैव तपोनाशो भविष्यति। "सीतां च तात रक्षिष्ये त्वयि याते सलक्ष्मणे" इति। यदि जटायुना रावणमार्गे वसता रावणं जित्वा सीता मोचिता स्यात् तदा रावणगृहे तन्निवासालाभात् ॥ १८० ॥ सकृत्कृतेन महिषीमानभंगेन पुनरपि कदाचिन्निजसंनिधाभावे मायया समागत्य सीतामपहरेत् इति शंकया राघवस्य सर्वात्मना रावणवधार्थविजृंभणं संभवेऽपि तपोबलसमन्विते तस्मिन् तद्विजृंभणं न प्रभवेदिति प्राग्ब्रह्मणस्तन्निश्चयो न जातः ॥ १८१ ॥

---

ऊन [ रागावून ] रामानें रावणाला मारिलें असतें, तथापि रावणाच्या घरीं ती राहून त्याचा तपोभंग व्हावयाला पाहिजे होता. अशा रीतीचा तपोभंग व्हावयाला मध्यें एक विघ्न होतें कीं, ' सीतां च तात रक्षिष्ये त्वयि याते सलक्ष्मणे " [ हे रामा, लक्ष्मणासहित तूं गेला असतां मी सीतेचें रक्षण करीन " ] असें ह्मणणारा जटायू रावणाचा मार्ग [ रस्ता ] रोंखून बसल्यामुळें कदाचित् रावणाला त्यानें जिंकून सीतेला सोडविलें असतें तर रावणाच्या घरीं सीता रहावी कशी? आणि त्याचा तपोभंग व्हावा कसा? व तो मरणार कसा? अशी शंका मनांत येऊन त्या वेळीं ब्रह्मदेवानें कार्याचा निश्चय केला नाहीं. ( १८० ) एकदां रावणानें आपल्या भार्येचा अपमान केला, आणि पुन्हा आपण नसतांना कपटरूपानें एखादे वेळीं तो सीतेला नेईल या करितां आतांच त्या रावणाला मारून टाकावें, अशी रामाच्या मनांत कल्पना आली असती, तर ती कल्पना वायां जाणार होती, कारण तो रावण अजून तपोबलानें युक्त होता. या प्रमाणें ब्रह्मदेवानें विचार करून पूर्वी रावणाच्या वधाचा निश्चय केला नाहीं. ( १८१ ) आतां अर्थात् जटायु मेल्यानंतर निश्चय केला

जटायुप्रयुक्तविघ्ननिवृत्तौ जातः इति एवं तपोबलसमन्वितो रावणस्तद्गृहे सीतावासनेन तद्भ्रंशनं विना हंतुं न शक्यः इति स्कांदे केदारखंडे स्पष्टीकृतम् ॥ १८२ ॥ तत्र ह्येवमुपाख्यायते-रावणेन निर्जिताः सर्वे देवास्तद्वधोपायं मंत्रयामासुस्तदा भगवान्नारायणस्तदीयं स्वमूर्धोपहारपर्यंतशिवाराधनरूपं तपःप्रभावं वर्णयित्वा भवद्भिस्ततोऽधिकं तपः कृत्वा स जेतव्य इत्युवाच ॥ १८३ ॥ तेऽपि तथाभूतं तपः कर्तुमशक्नुवंतः शिवं प्रसादयितुं शिवलोकं जग्मुः । तत्र शिवराजधानीपुरःस्थितेन

---

तें बरोबरच झालें. अशा मोठ्या तपोबलाच्या प्रभावानें युक्त जरी रावण होता, तरी एक वर्ष ती साध्वी जानकी त्याच्या घरीं राहिली ह्मणजे रावणाचा तपोभंग होईल, व तो हीनबळ झाल्यावर मग त्याला मारावयाला अडचण पडणार नाहीं. तपोभंग झाल्यावांचून त्याला मारावयाचें असाध्य होतें. अशा अर्थाचे श्लोक केदारखंडांत आहेत. ( १८२ ) त्या केदारखंडांत असें सांगितलें आहे कीं, रावणानें जेव्हां सर्व देवांचा पराभव केला, तेव्हां सगळे देव एका ठिकाणीं जमून विचार करूं लागले, तेव्हां भगवान् नारायणानें असें सांगितलें कीं, देव हो, विनाकारण पोकळ विचार करण्यांत काय अर्थ आहे? त्या रावणानें प्रति दिवशीं शिवाच्या नैवेद्याकरितां आपलें एकेक शिर कापून शिवाला प्रसन्न करून घेतलें आहे. तर असें उग्र तप केलेल्या रावणाला जिंकावयाचें असेल तर तुह्मी त्याच्यापेक्षां कडक तप करा. आणि मग त्या तपोबलानें रावणाला जिंका. ( १८३ ) असें त्या नारायणाचें भाषण ऐकून रावणापेक्षां उग्र तप करणें तर आपल्याला अशक्य आहे, असें जाणून सगळे देव शिवाला प्रसन्न करून घेण्यासाठीं तसेंच शि-

नंदिकेश्वरेण ॥ १८४॥ "क्व यूयं क्व शिवः शंभुस्तपसा परमेण हि । द्रष्टव्यो यदि मध्यस्थः सोऽद्य द्रष्टुं न पार्यते ॥१८५॥ यावद्भावा अनेकाश्च इंद्रियार्थास्तथैव च । यावच्च ममता भावस्तावदीशोऽपि दुर्लभः" ॥ १८६ ॥ इति शिवदर्शने नैराश्यं बोधिताः ततो रावणवधोपायं नंदिकेश्वरः स्वयमुवाच ॥१८७॥ "अपहासपरं वाक्यं पौलस्त्यस्य श्रुतं यदा । तदा मया च

---

वलोकाला गेले. तेव्हां तेथें शिवाच्या राजधानीपुढें पाहारा करणाऱ्या नंदिकेश्वरानें त्यांस "पुढें जावयाला शिवाची आज्ञा नाहीं," असें ह्मटलें, आणि शिवराजधानींत प्रवेश करावयाला साधन काय केलें पाहिजे, तेंही सांगितलें. ( १८४ ) नंदी ह्मणाला, देवहो तुह्मी कोणीकडे! आणि शिव कोणीकडे! तो तुह्माला कसा भेटणार? शिवपरतत्वाची भेट होण्याची तुह्माला इच्छा असेल तर अगोदर तपश्चर्या करा, नंतर त्या पुण्यप्रभावानें शिवाचें दर्शन घ्या. नाहीं तर नुसत्या ह्या अशा जाण्यानें तुह्माला शिवदर्शन व्हावयाचें नाहीं. ( १८५ ) जोंपर्यंत प्राण्याचे अनेक कल्पनातरंग चाललेले असतात, जोंपर्यंत विषयाचा लोभ सुटत नाहीं व जोंपर्यंत शरीरावरचा अभिमान जात नाहीं तोंपर्यंत तो कसलाही प्राणी असला तरी त्या प्राण्याला पूर्णपरब्रह्म अशा शिवाचें दर्शन घडणें दुर्लभ आहे. ( १८६ ) या प्रमाणें नंदिकेश्वराचें भाषण ऐकून सगळे देव निराश झाले. अशा निराश झालेल्या देवांना पाहून नंदिकेश्वरानें ह्मटलें कीं, हे ब्रह्मदेवादिक सर्व देवांनो तुह्माला शिवाचें दर्शन घेऊन रावणाला मारण्याचे प्रयत्न करावयाचे आहेत ना? तर मग मी एक युक्ति तुह्मांस सांगतों ती ऐका. ( १८७ ) पूर्वी एकदां त्या दुष्ट राक्षसानें माझी चेष्टा करून अपमान केला होता, तेव्हां तो अपमान मला सहन न होऊन मीं

शप्तोऽसौ रावणो लोकरावणः ॥१८८॥ ईदृशान्येव वक्त्राणि संभविष्यंति येषु वै । तैः समेतो महान्कोऽपि नरवर्यो महातपाः ॥ १८९ ॥ मां पुरस्कृत्य सहसा हनिष्यति न संशयः । एवं शप्तो मया ब्रह्मन् रावणो लोककंटकः ॥१९०॥ अर्चितं केवलं लिंगं परमेण समाधिना । पिंडिकारूपसंस्थानं विना तेन सुरोत्तमाः ॥१९१॥ विष्णुना हि महाभागाः स वः सर्वं विधास्यति । देवदेवो महादेवो विष्णुरूपो महेश्वरः ॥१९२॥ सर्वे यूयं प्रार्थयध्वं विष्णुं सर्वगुहाशयम् । अहं च सर्वदेवानां पुरोवर्ती भवामि वः " इति ॥१९३॥ ततस्तथैव नंदिकेश्वर-

---

त्या भयंकर रावणाला शाप दिला कीं, (१८८) चांडाळा रावणा, माझ्या या तोंडाला पाहून त्वां माझा अपमान केलास खरा, तरी अशींच माझ्यासारखीं तोंडें ज्या प्राण्यांना असतील, त्या प्राण्यांच्या सहाय्यानें कोणी एक मोठा मानवश्रेष्ठ (१८९) विशेषें करून मला पुढें करून तुला ठार मारणार आहे, असें तूं निःसंशय समज. या प्रमाणें सर्व लोकांशीं द्वेष करणाऱ्या रावणाला मीं शाप दिला. (१९०) आतां तो मानव कोण? व कसा आहे? तें सांगतों ऐका. ज्यानें धातू माती व शिळा यांनीं शिवलिंगाची पिंडिका न करितां उत्तम समाधि लावून आपल्या हृदयासनावर पंचसूत्र प्रमाणाच्या शिवलिंगाची स्थापना करून शिवपरब्रम्ह्याची आराधना केली. (१९१) तो कोण ह्मणाल तर तो साक्षात् विष्णू होय. तो विष्णूचें रूप घेणारा सर्व देवांचा देव असून महादेवाचा अवतार आहे. आणि पुढें तुमचें कार्य करणाराही तोच होईल. (१९२) ह्यास्तव हृदयरूपी गुहेंत निजलेल्या त्या विष्णुरूपी महेश्वराची तुह्मी प्रार्थना करा. आणि मीही तुह्मा सर्व देवांचा पुढाकार घेतों. असें त्यांस ह्मटल्यावर (१९३) नंदिकेश्वर वगैरे सर्व देव तेथून वैकुंठाला गेले व भ-

समन्विता देवा वैकुंठं गत्वा भगवंतं प्रार्थयामासुः ॥१९४॥ तान् प्रति भगवानेवमुवाच । "शैलादं च पुरस्कृत्य सर्वे यूयं त्वरान्विताः । अवतारान् प्रकुर्वंतु वानरीं तनुमाश्रिताः ॥१९५॥ अहं च मानुषो भूत्वा त्वज्ञानेन समन्वितः । संभविष्याम्ययोध्यायां गृहे दशरथस्य च ॥१९६॥ ब्रह्मविद्यासहायोऽहं भवतां कार्यसिद्धये । जनकस्य गृहे साक्षाद्ब्रह्मविद्या जनिष्यते ॥१९७॥ भक्तो हि रावणः साक्षाच्छिवध्यानपरायणः । तपसा महता युक्तो ब्रह्मविद्यां यदेच्छति ॥ १९८ ॥ तदा तदुभयभ्रष्टं रक्षो भवति तत्क्षणात् । सर्वेश्वरे न भक्तः स्यात्तस्यावीक्षणतत्परः" इति ॥ १९९ ॥ ततः सर्वे सुरगणा अवतार-

---

गवान् नारायणाची प्रार्थना करूं लागले. ( १९४ ) नंतर त्या नारायणानें त्यांना असें सांगितलें कीं, देवांनो, तुह्मी सर्वजण नंदिकेश्वराला पुढाकार देऊन पृथ्वीवर वानरांच्या योनींत जन्म घ्या. ( १९५ ) मी मात्र अयोध्या नांवाच्या राजधानींत दशरथाच्या घरीं कौसल्येच्या पोटीं जन्म घेतों. आणि शुद्ध इतर अज्ञानी मनुष्यांसारखा होतों. ( १९६ ) तेव्हां तुमच्या कार्यसिद्धीकरितां ब्रह्मविद्येचें सहाय्य मला घ्यावें लागेल ह्मणून ती ब्रह्मविद्या सीतेच्या रूपानें जनकराजाच्या घरीं अवतरेल. ( १९७ ) नंतर कांहीं कालानें शिवध्यानांत तत्पर असलेला शिवभक्त रावण जरी मोठा तपस्वी आहे, तथापि जेव्हां ब्रह्मविद्येची [ सीतेची ] तो इच्छा करील, ( १९८ ) तेव्हां शिवध्यानापासून आणि तपश्चर्येपासून तत्क्षणीं तो भ्रष्ट होईल, शिवाय ब्रह्मविद्येवर [ सीतेवर ] नेहमीं विषयाच्या लोभानें पापदृष्टि ठेवल्यामुळें अर्थात् शिवावरची त्याची भक्ति क्रमाक्रमानें क्षीण होईल, या प्रमाणें नारायणानें देवांना अभयवचन दिलें. ( १९९ ) नंतर सगळ्या देवांनीं भूमीवर अवतार

पराभवन्। "वालिरिंद्रांशसंभूतः सुग्रीवो भास्वतः सुतः॥२००॥ तथा ब्रह्मांशसंभूतो जांबवान् कपिकुंजरः । शिलादतनयो नंदी शिवस्यानुचरः प्रियः ॥२०१॥ एकांशेन महाभागो हनुमान्स महाकपिः। अवतीर्णाः सहाय्यार्थं विष्णोरमिततेजसः" इति च ॥ २०२ ॥ अतः परमेश्वरः स्वानुचरनंदिप्रतिज्ञापरिपालनार्थं रावणवधोपायमुपादिष्टवतः पश्चादज्ञानं परिगृह्य रघुनाथरूपेणावतीर्णवतः स्वमूर्त्यैकरूपस्य नारायणस्य प्रतिज्ञापरिपालनार्थं च चिरं रावणगृहे सीतायावासनं संकल्पयामासेति युक्तमेव ॥ २०३ ॥ एवं च श्रीरामचंद्रोऽवबुध्यते चेत्तदानीमेव

---

घेतले. इंद्र हा आपल्या अंशानें वाली नांवाचा वानर झाला. सूर्य हा सुग्रीव नांवाचा वानर झाला. (२००) ब्रह्मदेव आपल्या अंशानें जांबवान् झाला. शिलादाचा मुलगा शिवभक्तपरायण नंदिकेश्वर हा (२०१) आपल्या एका अंशानें हनुमान नांवाचा मोठा बलाढ्य वानर झाला. या प्रमाणें अपरिमित तेजस्वी महाविष्णूच्या सहाय्याकरितां सगळे देव आपापल्या अंशानें अवतरले. (२०२) असो. या इतिहासावरून आपला अनुचर [ दूत ] जो नंदी, त्याची प्रतिज्ञा पाळण्याकरितां परमेश्वरानें असाच संकल्प केला होता असें सिद्ध होतें. दुसरें असें कीं, देवांना रावणाच्या मरणाला ज्यानें युक्ति सुचविली, व सगळे देव पृथ्वीवर अवतरल्यानंतर पुढें अज्ञान घेऊन रामाच्या रूपानें ज्यानें अवतार घेतला, आणि ज्याला शिवाच्या एका मूर्तीपैकीं एक मूर्ति ह्मणून ह्मणतात, त्या नारायणाच्या प्रतिज्ञेचें रक्षण करण्याकरितां चिरकाल सीतेचा वास रावणाच्या घरीं व्हावा, असा शिवानें संकल्प केला, असें जें मागें सांगितलें, तें बरोबर आहे, असें सिद्ध होतें. (२०३) आणि तिसरें असें

रावणसंजिहीर्षया बाणान् संदध्यात् तेन रावणवधनिर्वृत्त स्वसंकल्पवैतथ्यं तदनिर्वृत्तौ रामचापस्य मोघतेति दोषद्वयस्यापि परिहारार्थं तदवबोधद्वाराणि परमेश्वर एव निरुरोधेति तात्पर्यं ॥ २०४ ॥ अथ हेत्वंतरेणापि शिवस्य सर्वनियंतृत्वे कवेस्तात्पर्यमाविष्करोति ॥ २०५ ॥ " तत्रोद्यते सकलसंहरणाय भीता सद्यो दशाननवधोऽस्त्विति वांच्छया च। यच्चापरोपितशरं तमुपेत्य देवस्तत्रापि सर्वजगदीश स एव हेतुः "

---

कीं, श्रीरामाला अज्ञान नसून रावण सीतेला घेऊन जाणार, किंवा नेल्यानंतर अमक्या ठिकाणीं तो घेऊन गेला, असें जर प्रथम कळलें असतें, तर तत्काळ रावणाला मारण्याकरितां धनुष्याला बाण लावून रामानें सोडला असता, मग त्या बाणानें रावण मेला असता तर आपला संकल्प व्यर्थ झाला असता, किंवा मेला नसता तर एकबाणी रामाचा बाण तरी व्यर्थ झाला असता, अशा दोन अर्थानें श्रीशिवानें श्रीरामाचीं ज्ञानाचीं सगळीं दारें झांकून टाकिलीं होतीं, असेंच सिद्ध होतें. ( २०४ ) असो. आतां दुसरे हेतु दाखवून शिवच सर्व जगाचा नियंता [ शासन करणारा ] आहे, असें कवीच्या आशयावरून [तात्पर्यावरून] सिद्ध करितात. ( २०५ ) जेव्हां रामानें आपली जानकी नाहींशी झालेली पाहून संतापानें "तिन्ही लोक जाळून टाकितों," असें ह्मणून धनुष्याला बाणसंधान केलें, तेव्हां आतां सर्वजण आह्मी मरणार अशा भीतीमुळें ह्मणा, किंवा आतांच्या आतां रावण मरून जाऊं दे, अशा इच्छेमुळें ह्मणा, देवांपैकीं कोणीतरी एका देवानें रामाजवळ येऊन सीता अमुक ठिकाणीं आहे, असें सांगितलें असतें. आतां ज्याअर्थीं कोणींही देवानें सांगितलें नाहीं, त्याअर्थीं शिवाचा संकल्पच न सांगण्याला कारण आहे असें ह्मट-

॥ २०६ ॥ रघुनाथे क्रुधा देवासुरमानुषादिसकलत्रैलोक्यसंहरणाय कृतबाणसंधाने देवासुरादीनां सर्वेषामपि महती भीतिरुत्पद्येतैव । तस्य हि क्रोधस्त्रैलोक्यसंहरणप्रातिज्ञा तदर्थं बाणसंधानं चैवं वर्णितानि ॥ २०७ ॥ " न धर्मस्त्रायते सीतां व्हियमाणां महावने । भक्षितायां हि वैदेह्यां हृतायामपि लक्ष्मण । ॥ २०८ ॥ के हि लोके प्रियं कर्तुं शक्ताः सौम्यममीश्वराः । कर्त्तारमपि लोकानां शूरं करुणवेदिनम् ॥ २०९ ॥ अज्ञाना-

---

ल्यावांचून गत्यंतरच नाहीं. ( २०६ ) पहा, रामानें देव, दैत्य, असुर, मनुष्य किंवहुना त्रैलोक्यच जाळण्याकरितां बाणसंधान केलें, तेव्हां देव, दैत्य वगैरे सर्व प्राण्यांना भीति उत्पन्न होणें साहजीकच आहे. कारण राम संतापाच्या भरांत त्रैलोक्य जाळून टाकितों, असें बोलून गेला होता. शिवाय त्याच उद्देशानें बाणसंधान त्यानें केलें होतें. [ " कवीनें सुद्धां असेंच वर्णन केलें आहे," असें ह्मणून आपल्या सिद्धांताला बळकटी आणण्या करितां कवीनें त्यावेळीं केलेलें वर्णन ग्रंथकार दाखवितो. ] ( २०७ ) [ राम लक्ष्मणाला ह्मणतो ] लक्ष्मणा, या मोठ्या रानांत जानकी एकटी असतां तिचा छल करून कोणीं दुष्टानें तिला नेलें, त्या वेळेस जानकीचें रक्षण तिच्या पातिव्रत्यानेंच [ धर्मानें ] केलें असेल नाहीं बरें ? शिवाय ज्या राक्षसानें नेलें, त्या वेळेस माझ्या सीतेनें पुष्कळ आढेवेढे घेतले असतील, आणि तसा तिचा हट्ट पाहून तिला खाण्याकरितां तो राक्षस तिच्या आंगावर धांवला असेल, त्यावेळेस सुद्धां तिचें कडक पातिव्रत्यच त्या दुष्टापुढें आडवें झालें असेल नाहीं बरें ? ( २०८ ) हे शांतस्वभावाच्या लक्ष्मणा, जो मी लोकांचा शासनकर्ता असून एवढा शूर ह्मणवितों, परंतु आतां मात्र करुणस्वरानें बोलतों, ह्मणून कोण या जगांत असा सामर्थ्यवान् आहे कीं जो माझें पारिपत्य करूं शकेल ? ( २०९ )

दवमन्येरन् सर्वभूतानि लक्ष्मण । मृदुं लोकहिते युक्तं दांतं करुणवेदिनम् ॥ २१० ॥ निर्वीर्य इति मन्येरन्नूनं मां त्रिदशेश्वराः । मां प्राप्य हि गुणो दोषः संवृत्तः पश्य लक्ष्मण ॥२११॥ अद्यैव सर्वभूतानां रक्षसां विलयाय च । संहृत्यैव शशिज्योत्स्नां महान्सूर्य इवोदितः । संहृत्यैव गुणान् सर्वान् मम तेजः प्रकाश्यते ॥ २१२ ॥ नैव यक्षा न गंधर्वा न पिशाचा न राक्षसाः । किन्नरा वा मनुष्या वा सुखं प्राप्स्यंति लक्ष्मण ॥२१३॥

---

किंवा प्राणिमात्रांमध्यें माझ्या पराक्रमाला न जाणून या जगांत माझा अपमान करणारा कोण आहे सांग बरें ? लक्ष्मणा, मला दुसरा असा एक संशय येतो कीं. मुळापासून माझा स्वभाव कोमळ आहे, आणि नेहमीं मी जगाच्या हितासाठीं झटत असतों. शिवाय माझ्या अकरा इंद्रियांपैकीं एका इंद्रियाला सुद्धां केव्हांही बहकूं देत नाहीं, आणि सदोदित मी सर्वांबरोबर चांगलें बोलत असतों, ( २१० ) ह्मणून सगळे देव मला " निर्वीर्य " असें मानीत असतील काय ! लक्ष्मणा, यावरून माझ्या मागें एका बाजूनें गुण घिरट्या घालितो, आणि एका बाजूनें दोषही घिरट्या घालितो, माझेच चांगले गुण माझ्या अनहिताला कारण झाले काय ? ( २११ ) या करितां मी असें करितों कीं, सूर्य जसा चंद्राच्या किरणांना गिळून मोठा तेजस्वी होऊन उदयास येतो, त्याप्रमाणें मी सुद्धां माझ्या शम दम इत्यादि गुणांना गिळून माझ्या खऱ्या वीर्यरूपी तेजाला बाहेर पाडतों याला कारण काय ह्मणून विचारशील तर सांगतों ऐक. त्या तेजानें आजच्या आज जगांतल्या सर्व प्राण्यांना आणि सर्व राक्षसांना मी जाळून टाकितों. (२१२) आणि या माझ्या तेजामुळें यक्ष, गंधर्व राक्षस, पिशाच, किन्नर, मनुष्य इत्यादि प्राण्यांना फार

ममास्त्रबाणसंपूर्णमाकाशं पश्य लक्ष्मण । निःसंपातं करिष्यामि ह्यद्य त्रैलोक्यचारिणाम् ॥ २१४ ॥ सन्निरुद्धग्रहगणमावारितनिशाचरम् । विप्रनष्टाखिलमरुद्भास्करद्युतिवर्जितम् ॥ २१५ ॥ विनिर्मथितशैलाग्रं शुष्यमाणजलाशयम् । ध्वस्तद्रुमलतागुल्मं विप्रणाशितसागरम् ॥ २१६ ॥ त्रैलोक्यं तु करिष्यामि संयुक्तं कालधर्मणा । न तां कुशलिनीं सीतां प्रदास्यंति सुरेश्वराः ॥ २१७ ॥ अस्मिन् मुहूर्ते सौमित्रे मम द्रक्ष्यंति विक्रमम् । नाकाशमुत्पतिष्यंति सर्वभूतानि लक्ष्मण ॥ २१८ ॥ आकर्णपूर्णैरिषुभिर्जीवलोकं निरंतरैः । करिष्ये

---

कष्टाची वेळ क्वचित येणार आहे असें पक्कें समज. (२१३) लक्ष्मणा, पहा पहा? आतां माझ्या अस्त्रांनीं आणि बाणांनीं आकाश भरून सोडितों. आज त्रैलोक्यांत संचार करणाऱ्या सर्व प्राण्यांचा नाश करून सोडितों (२१४) ज्या त्रैलोक्यांत आनंदानें आज सर्व ग्रह फिरतात, ज्या त्रैलोक्यांत आज अप्रतिबद्ध गतीनें [ ज्यांना कोठेंही जाण्याला बंदी नाहीं अशा गतीनें ] निःशंक राक्षस लोक फिरताहेत, ज्या त्रैलोक्यांत मरुद्गण स्वेच्छाविहार करतात, तसेंच जेथें आज सूर्य विनधोक आपलीं किरणें पाडतो, (२१५) ज्या त्रैलोक्यांत आज अनेक पर्वत, नद्या, सरोवरें वगैरे दृष्टीस पडत आहेत, ज्या त्रैलोक्यांत आज अनेक वृक्ष, वेली, गुल्म समुद्र वगैरे दिसत आहेत, (२१६) त्या त्रैलोक्याला आज नाहींसें करून टाकितों. लक्ष्मणा, ज्या अर्थीं हे देव माझ्या जानकीला सुरक्षितपणें परत देत नाहींत, त्या अर्थीं मला असें करणें भागच आहे. (२१७) या घटिकेंत ते देव माझ्या पराक्रमाला पाहतील. लक्ष्मणा, हे सर्व प्राणी आज या घटिकेंत आकाशाच्या वर किंवा खालीं गती न मिळतां मधल्यामध्यें गिरकांड्या खात सुटतील. (२१८) हे

मैथिलीहेतोरपिशाचमराक्षसम् ॥ २१९ ॥ मम रोषप्रयुक्तानां सायकानां बलं सुराः । द्रक्ष्यंत्वद्य विमुक्तानामतिदूरातिगामिनाम् ॥ २२० ॥ नैव देवा न दैतेया न पिशाचा न राक्षसाः । भविष्यंति मम क्रोधात्त्रैलोक्ये विप्रणाशिते ॥२२१॥ देवदानवयक्षाणां लोका ये रक्षसामपि । बहुधा निपतिष्यंति बाणौघैः शकलीकृताः ॥२२२ ॥ निर्मर्यादानिमाल्लोकान् करिष्याम्यद्य सायकैः । हृतां मृतां वा सौमित्रे न दास्यंति ममेश्वराः ॥ २२३ ॥ तथारूपां हि वैदेहीं न दास्यंति यदि प्रियाम् । नाशयामि जगत्सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् ॥ २२४ ॥

---

लक्ष्मणा, आज माझ्या जानकीकरितां धनुष्याला खेंचून पुष्कळ बाण लाऊन या जीवलोकांमध्यें पिशाच राक्षस वगैरे प्राणी होते किंवा नव्हते असें करून टाकितों. ( २१९ ) आज माझ्या संतापानें हातांतून निसटलेल्या आणि त्यामुळें फार दूरपर्यंत गती मिळालेल्या बाणांचा प्रभाव सगळे ते नीच देव पाहतील. (२२०) त्या बाणांच्या योगानें आणि माझ्या संतापाच्या योगानें आज त्रैलोक्य नाहींसें झाल्यावर ते देव, दैत्य, ते राक्षस, ते पिशाच आपेआप नाहींसें होतील. ( २२१ ) मग देव, दानव, यक्ष, राक्षस वगैरे सर्व माझ्या बाणांच्या पिंजऱ्यांत सांपडून ढांसळून त्यांचे तुकडे तुकडे होऊन पडतील. ( २२२ ) माझी जानकी कोणीं चोरून नेलेली असो, मेलेली असो, तिला त्यांनीं परत आणून द्यावी परंतु अजून ते देव तसें करीत नाहींत. सौमित्रे, पहा. माझ्या बाणांनीं कोणत्या लोकाची हद्द कोठपर्यंत होती, हिचा पत्ता सुद्धां आज नाहींसा करून सोडतों. ( २२३ ) जानकीला देत नसतील, तर चराचरात्मक [ जड जीव ज्यांत आहेत अशा ] त्रैलोक्याचा एका क्षणांत फन्ना उडवून टाकितों. २२४ ) असें बोलून रागानें डोळे लाल करून धनुष्य ओ-

इत्युक्त्वा रोषताम्राक्षो रामो निष्पीड्य कार्मुकम् । शरमादाय संदीप्तं घोरमाशीविषोपमम् ॥ २२५ ॥ संदधे धनुषा श्रीमान् रामः परपुरंजयः । युगांताग्निरिव क्रुद्धो निश्वसन्निदमब्रवीत् ॥ २२६ ॥ यथा जरा यथा मृत्युर्यथा कालो यथा विधिः । नित्यं न प्रतिहन्यंते सर्वभूतेषु लक्ष्मण । तथाऽहं क्रोधसंयुक्तो न निवार्योस्म्यसंशयम् ॥ २२७ ॥ पुरेव मे चारुदतीमनिंदितां दिशंति सीतां यदि नाद्य मैथिलीम् । सदेवगंधर्वमनुष्यगुह्यकं जगत्सशैलं परिवर्तयाम्यहम् " इति ॥२२८॥ एवमतिक्रुद्धे रघुवीरे सकलत्रैलोक्यसंहरणोद्यते त्रैलोक्यवर्तिषु भूतेषु कस्य भीतिर्नोत्पद्येत? सागरमात्रसंहरणोद्यते हि तस्मिन् सर्वभूतत्रासो वर्णितः एवंभूते समये लोकसंरक्षणाय शक्रादिषु केनापि देवेनागस्य सकलैरपि देवैर्दुर्धर्षेण

---

ढून कालकूट विषासारखा भयंकर तेजस्वी बाण हातांत घेऊन (२२५) श्रीमान् रामानें तो धनुष्याला लाविला, आणि प्रलयकालाच्या भयंकर अग्नीप्रमाणें लाल होऊन तो पुन्हा बोलूं लागला. (२२६) लक्ष्मणा, जसें म्हातारपण, जसा मृत्यु, जसा काल, जसा विधि, हे कांहीं झालें तरी माघारे न घेतां सर्व प्राण्यांवर आपला अधिकार गाजवितात, तसा मी संतापाला चढलों म्हणजे कोणाला ऐकणार नाहीं हें पक्कें समज. (२२७) लक्ष्मणा, इतक्यांत माझ्या सुंदर जानकीला कोणीं आणून दिलें तर बरें, नाहीं तर गंधर्व, देव, मनुष्य, गुह्यक, पर्वत, नद्या इतक्यां सहित या जगाला धुळींत मिळवून टाकितों. (२२८) याप्रमाणें राम संतापाला चढून त्रैलोक्यांचा नाश करावयाला प्रवृत्त झाला असतां त्रैलोक्यांतल्या कोणत्या प्राण्याला भीति उत्पन्न होणार नाहीं बरें? पहा कीं, समुद्र रस्ता देईना, म्हणून त्याच्यावर बाण

रावणेन प्रसह्य हृता सीता तेन लंकां नीता जीवतीति रामे प्रतिवक्तव्यं न च रावणभयात्तदनुक्तिरिति शंकनीयम् । रावणं हंतुं समर्थस्य तदर्थं संरंभवतः कस्यचिदलाभे हि रावणाद्भेतव्यं ॥ २२९ ॥ अस्मिन् वृत्तांते रघुवीरस्त्रैलोक्यसंहरणाय संहितं शरं रावण एव सकल राक्षससहिते प्रयुंजीत तेन तदानीमेव तस्य सपुत्रबांधवस्य वधोस्त्वितीच्छया देवेषु केनचिदागत्य वक्तुमेवोचितम् ॥ २३० ॥ रावणवधे सन्नद्धं रघुवीरमालक्ष्य शक्रेण तस्य युद्धसमये समारुह्यावस्थानार्थं मातलिः सारथिः

---

उगारल्यावेळीं सर्व प्राण्यांना त्रास झाला, तर यासमयीं अलबत सर्वांना त्रास झाला असला पाहिजे, आणि त्या त्रासाच्या निवारणाकरितां कोणीं तरी एका देवदूतानें किंवा सगळ्या देवांनीं येऊन प्रबल रावणानें बलात्कारानें सीतेला नेऊन आपल्या लंकेंत ठेविलें आहे, आणि ती जिवंत आहे, अशी बातमी रामाला द्यावयाला पाहिजे होती. आतां येथें कदाचित् कोणी शंका घेतील कीं, "रावणाच्या भीतीनें देवांनीं रामाला बातमी दिली नाहीं" तर या शंकेंत कांहीं अर्थ नाहीं. कारण, रावणाला मारणारा समर्थ प्राणी जर कोणी जगांत उपजला नसता तर रावणापासून भीति वाळगणें सयुक्तिक झालें असतें. ( २२९ ) आतां मागील कथाभागांत रामानें त्रैलोक्याच्या संहाराकरितां बाणसंधान केलें होतें, असें जें सांगितलें, तेव्हां रावणाचा वंश सुद्धां या जगांत नको, अशी जर देवांची इच्छा होती, तर त्यावेळेस संतापलेल्या रामाला कोणींतरी देवानें रावणाचा पत्ता सांगावयाला पाहिजे होता, ( २३० ) आतां रावणाबद्दल देवांचा वाईट हेतु नव्हता ह्मणावें तर तसेंही संभवत नाहीं. कारण, पुढें जेव्हां रावणाला मारण्याला राम तयार झाला, तेव्हां रामाच्या सहाय्याकरितां आपण होऊन देवांनीं मातलि नांवाचा सा-

स्वकीयरथोपि किल प्रेषितः न चास्मिन् समयेऽपि तथोक्तं अतस्तदवचने प्रागुक्तः परमेश्वरसंकल्प एव हेतुः कविना विवक्षित इत्यर्थः ॥ २३१ ॥ महाभारते हि " साल्ववधार्थं कृतशरसंधानः प्रद्युम्नो देवैः साल्वस्य कृष्णवध्यत्वविषयेश्वरसंकल्पवचनेन निवारितः " इति वर्णितम् ॥ २३२ ॥ " नैष वध्यस्त्वया वीर साल्वराजः कथंचन । संहरस्व पुनर्बाणं न वध्योऽयं त्वया रणे ॥२३३॥ एतस्य हि शरम्याजौ न वध्योऽस्ति पुमान् क्वचित् । मृत्युरस्य महाबाहो रणे देवकिनंदनः । कृष्णः संकल्पितो धात्रा तन्न मिथ्या भवेदिह " । इति तत्तु-

---

रथी पाठविला. आणि आपला रथही पाठविला, आणि ह्यावेळीं मात्र इंद्रादिक सर्व देवांनीं तसें येऊन रामाला रावण अमुक ठिकाणीं आहतो, अशी बातमी कां दिली नाहीं? तेव्हां पूर्वींचा शिवाचा संकल्पच न सांगण्याला कारण आहे, असें ह्मटल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. ( २३१ ) आतां महाभारतांतलें उदाहरण सांगून शिवच सर्वोत्कृष्ट आहे, असें दाखवितों. ] जेव्हां साल्वाला मारण्याकरितां प्रद्युम्नानें धनुष्याला बाण लाविला, तेव्हां साल्व हा कृष्णाचा भाग आहे. असा शिवाचा संकल्प होता ह्मणून त्या वेळेस प्रद्युम्नाला दूर सारिलें असें वर्णन केलें आहे, तें असें. ( २३२ ) हे वीरा प्रद्युम्ना, हा साल्व तुझ्या कडून मरणारा नव्हे, यांकरितां धनुष्याला चढविलेला तो बाण परत घे. ( २३३ ) प्रद्युम्ना, या जगांत साल्वाला मारणारा एका प्राण्याशिवाय दुसरा कोणी समर्थ नाहीं. हे बहुशाली प्रद्युम्ना, तो प्राणी कोण ह्मणशील तर देवकीचा मुलगा कृष्णच होय. बाबा तुझा कृष्णच त्या साल्वाचा मृत्यु ह्मणून शिवानें पूर्वीं संकल्प केला

ल्यसरणिरयं संदर्भः । एवं कवेस्तत्रोक्तिभंग्या शिवमहिमा-विष्करणं प्रपंचितम् ॥ २३४ ॥ अथ कविनिबद्धस्य वक्तु विश्वामित्रस्य वचनभंग्यापि तदाविष्करणं दर्शयति ॥२३५॥ " गंगा शिवे शिरसि ते पतनेन पुण्या पापापनोदनविनोद-पटीयसीति । देवादयोऽपि वसुधातलवासमाप्ताः स्नातास्तथेति स वचो निबबंध चार्षम् ॥ २३६ ॥" तत्र तावद्भगीरथं प्रति तपसा प्रीतस्य ब्रह्मणो वचनं पठितम् ॥२३७॥ " गंगायाः पतनं राजन् पृथिवी न सहिष्यते । तां वै धारयितुं वीर ना-

---

आहे, आणि तो संकल्प खोटा व्हावयाचा नाहीं. याकरितां तुझा बाण तूं आंवरून घे. याप्रमाणें महाभारतांतला कवीचा आशय जसा आहे, त्याप्रमाणें प्रस्तुत सांगितलेल्या रामायणां-तला कवीचा आशयही तसाच आहे. याप्रमाणें कवीच्या उ-क्तीच्या शैलीवरून शिवाच्या महात्म्याचें वर्णन विस्तारानें केलें. ( २३४ ) आतां कवीनें आपल्या प्रबंधांत विश्वामित्र ऋषीच्या वचनांनीं शिवमहिमा वर्णिलेला आहे, तें दाखवितों. ( २३५ ) हे शिवा, आपल्या [ शिवाच्या ] मंगलकर मस्तकावर गंगेनें उडी टाकिली, तेव्हांपासून जगांतल्या सर्व लोकांचें पाप मी जाळून टाकिते, असें जगांत ती गंगा आढ्यतेनें ह्मणत आहे. तर हे प्रभो, हा आपला प्रभाव नव्हे काय ? आणि हें जाणूनच सगळे देव त्या गंगेचें स्नान निरंतर घडावें ह्मणून स्वर्ग सोडून येथें पृथ्वीवर राहावयाला आले. शिवाय कवीनें सुद्धां आपल्या निबंधाला शो-भा आणण्याकरितां सुरस कथाभाग आणिला आहे पहा (२३६) त्यांत प्रथमतः भगीरथ राजाच्या तपश्चर्येनें प्रसन्न झालेल्या ब्र-ह्मदेवाचें भाषण सांगतात. ( २३७ ) "हे राजा, गंगेची उडी फार जोराची असल्यामुळें तिचा वेग पृथ्वीला सहन होणार नाहीं, ह्मणून गंगेच्या वेगाला सहन करणारा प्राणी पूर्ण पर-

न्यं पश्यामि शूलिनः" इति ॥ २३८॥ महाभारते तु तपसा प्रसादितया गंगयेत्थमुक्तं पठितं ॥ २३९ ॥ "करिष्यामि महाभाग वचस्ते नात्र संशयः। वेगं तु मम दुर्धार्यं पतन्त्या गगनाच्च्युतम् ॥ २४० ॥ न क्षमस्त्रिषु लोकेषु कश्चिद्धारयितुं नृप। अन्यत्र विबुधश्रेष्ठान्नीलकंठान्महेश्वरात्" इति ॥ २४१ ॥ ततस्तेन तपसा प्रसादितस्य शिवस्य परममंगले परमपावने मूर्ध्नि गंगायाः पतनं शिवेन कृतं तदवलेपनिर्धूननमित्यादिकं ॥ २४२ ॥ "आकाशादपतद्राम शिवे शिवशिरस्युत। अचिंतयच्च सा देवी गंगा परमदुर्धरा ॥ २४३ ॥ विशाम्यहं हि

---

ब्रह्म शिवपरतत्वावांचून जगांत दुसरा कोणी दिसत नाहीं." असें सांगून याच अर्थाचें महाभारतांतलें (२३८) भगीरथ राजाच्या तपश्चर्येला प्रसन्न झालेल्या गंगेचें वचन सांगतात. (२३९) "हे भाग्यशाली राजा, त्वां ह्मटल्याप्रमाणें मी निःसंशय करितें, परंतु माझा वेग फार दुर्धर आहे, माझा प्रवाह एकदम आकाशांतून "धों धों करीत सुटल्यानंतर (२४०) त्रैलोक्यांत त्या वेगाला धरणारा कोणी समर्थ नाहीं. नाहीं ह्मणावें तर सर्व देवादिकांत परम श्रेष्ठ असे शिव मात्र आहेत (२४१) तें ऐकून भगीरथ राजानें पुनः शिवाचें तप करून "मी आपले डोक्यावर गंगेला घेतों," असा शिवाचा प्रसाद मिळविल्यानंतर परम मंगलकर, परम पवित्र अशा मस्तकावर श्रीशिवानें तिचा वेग घेतला. तत्क्षणीं अल्प बुद्धीच्या गंगेला गर्व झाला. आणि श्रीशिवानें तिच्या त्या गर्वाचा परिहार केला, तो असा. [ रामायणांतले श्लोक ] (२४२) [ विश्वामित्र ह्मणतो ] बा रामा, आकाशांतून परम मंगल शिवाच्या मस्तकावर वेगवती गंगेनें उडी टाकल्यावर तिनें विचार केला कीं, श्रीशिवानें कांहीं एक मनांत विचार न करितां माझा वेग धरिला खरा, (२४३) परंतु

पातालं स्रोतसा गृह्य शंकरम् । तस्यावलेपनं ज्ञात्वा क्रुद्धस्तु भगवान्हरः ॥ २४४ ॥ तिरोभावयितुं बुद्धिं चक्रे त्रिनयनस्तथा । सा तस्मिन् पतिता पुण्या पुण्ये रुद्रस्य मूर्धनि । हिमवत्प्रतिमे राम जटामंडलभास्वरे ।" इत्यादि संदर्भेणोक्त्वा तदनंतरमुक्तं ॥ २४५ ॥ "तत्र देवर्षिगंधर्वा वसुधातलवासिनः । भवांगपातितं तोयं पवित्रमिति पस्पृशुः ॥२४६॥ शापात्प्रपतिता ये च गगनाद्वसुधातलम् । कृत्वा तत्राभिषेकं ते बभूवुर्गतकल्मषाः ॥ २४७ ॥ धूतपापाः पुनस्तेन तोयेनाथ सुभास्वता । कृताभिषेका गंगायां बभूवुर्विगतक्लमाः" इति ।

---

आतां या माझ्या वेगासरशीं पाताळापर्यंत ह्या शिवाला वाहून नेलें, असा गंगेला गर्व झालेला जाणून भगवान् श्रीशिव संतापानें लाल झाले, (२४४) आणि तिला आपल्या जटेंत गुरफटून टाकण्याचा त्यांनीं विचार केला. पुढें कांहीं कारणानें तिचा गर्व परिहार होऊन श्रीशिवाच्या आज्ञेनें ती गंगा त्यांच्या परम पवित्र मस्तकापासून जणु दुसरा जटासमूहच अशा हिमालयावर उतरून पुढें पाताळापर्यंत वाहत गेली. "असें सांगून पुढें दुसरा कथाभाग सांगतात." (२४५) ज्या ठिकाणीं पवित्र गंगा वाहत गेली होती, त्या ठिकाणीं पृथ्वीवर राहण्याकरितां आलेले सगळे देव, ऋषि, गंधर्व वगैरे गंगेचें पाणी पाहून हें शिवाच्या आनंदमय शरीरापासून वाहत आलेलें आहे, असें ह्मणून सर्वांनीं त्या पाण्यांत स्नान केलें. (२४६) दुसरे कांहीं पुण्यवान् लोक शापाच्या योगानें पृथ्वीवर पुण्यभ्रष्ट होऊन पडल्यामुळें त्या पातकाच्या क्षालनाकरितां गंगेंत त्यांनीं स्नान केलें, व ते सर्व तत्क्षणीं निष्पाप [ पापरहित ] झाले. (२४७) त्या पवित्र तेजस्वी पाण्याचा शापग्रस्त लोकांनीं स्पर्श केल्यामुळें ते पापरहित होऊन पुनः एकदां त्यांनीं

तत्सर्वमेतेन श्लोकेन संगृहीतं ॥ २४८ ॥ एवं शिवमहिमातिशय-प्रतिपादनं बहुस्थलेषु प्रवितत्मुदाहृत्य तन्निकर्षप्रतिपादनछा-यापन्नस्य चपलोक्तिनिभस्य परशुरामवाक्यसंदर्भस्य प्रतीयमा-नार्थतात्पर्यमाह ॥ २४९ ॥ " नारायणस्य धनुषस्तव भीम-चापादुत्कृष्टतां गणयतः किल भार्गवस्य । यन्मेनिरे त्वदधिकं तमितीह वाक्यं तद्बाधितं च वचनेन रघूद्वहस्य " ॥ २५० ॥ श्रीरामचंद्रेण जनकगृहे शैवं धनुः समारोपयता भग्नमित्याक-र्ण्य तथाविधं क्षत्रियोत्कर्षमसहमानो भार्गवः पथि समागतः स्वहस्ते स्थितं वैष्णवं धनुः शैवाद्धनुषोधिकं मन्वानः श्रीरा-मचंद्रं प्रति इदं धनुःसमारोप्य तत्र शरसंधानं कुरु ततस्तव

---

स्नान करून आपला शीण नाहींसा करून घेतला. याप्रमाणें सर्व वर्तमान आतांच्या एका श्लोकानें सांगितल्याप्रमाणें झालें. (२४८) असो, या प्रमाणें शिवमाहात्म्याचें उत्कृष्टत्व पुष्कळ ठिकाणीं असेंच वर्णिलें आहे, आणि त्याचीं अनेक उदाहरणें हीं येथ-पर्यंत बहुतेक दिलींच आहेत. आतां शिवमाहात्म्याला कांहीं ठिकाणीं निकृष्टत्व ( हीनपणा ) कवीनें भासविल्याप्रमाणें केलें आहे, त्यांपैकीं या रामायणांतच एका ठिकाणीं परशुरामाच्या भाषणाचा ओघ एखाद्या चपळ मनुष्यानें केलेल्या भाषणाप्रमाणें दिसतो, ह्या परशुरामाच्या भाषणांत वरवर भासणारा अर्थ कसा भासतो, हें दाखवितात, व पुढें खरा अर्थ करून शिवमाहात्म्यच सर्वोत्कृष्ट आहे असें दाखवितात. ( २४९ ) हे शंकरा, आपल्या भयंकर शैव धनुष्यापेक्षां नारायणाचें धनुष्य श्रेष्ठ आहे. असें परशुरामानें विधान केलें खरें, परंतु त्याच संदर्भांत दाशरथि रा-मानें आपल्या वाक्यानें परशुरामाच्या सिद्धांताला बाध आणिला आहे. तें प्रतिपादन करून दाखवितों. ( २५० ) श्रीरामानें जनकराजाच्या घरीं शैव धनुष्याला प्रत्यंचा [ दोरी ] चढऊन

मया सह युद्धयोग्यतामालक्ष्य त्वया योद्धास्मीत्युक्तिसमये इदमुपाख्यानमाह ॥ २५१॥ पुरा शिवनारायणयोर्बलतारतम्यं जिज्ञासमानैर्देवैः प्रार्थितेन कमलभुवा तेन तयोः केनचिदुपायेन विरोध उत्पादिते विश्वकर्मणा निर्माय दत्तमिदं धनुर्द्वयं गृहीत्वा ताभ्यां प्रवृत्ते युद्धे शिवो नारायणेन निर्जितो देवाश्च

---

त्या धनुष्याचा जेव्हां भंग केला, तेव्हां ही गोष्ट सहज परशुरामाच्या कानापर्यंत गेली. नंतर क्षत्रियकुलांत उत्पन्न झालेल्या दाशरथि रामाचा अशारीतीनें झालेला उत्कर्ष परशुरामाला सहन न होऊन श्रीराम इकडूनच अयोध्येला जाणार आहे अशी बातमी ऐकून त्याच रस्त्यांत रामाची वाट पहात हातांत प्रचंड नारायण धनुष्य घेऊन तो परशुराम रामाचा रस्ता रोखून बसला. नंतर थोड्या अवकाशानें जेव्हां दाशरथीराम तेथें आला, तेव्हां परशुरामानें त्याला पुढें जाऊं न देतां असें ह्मटलें कीं, रामा, माझ्या हातांतलें हें धनुष्य घेऊन ह्यास बाण लाव, नंतर तुझी माझ्याबरोबर लढण्याची शक्ति आहे कीं काय हें पाहून मग मी युद्ध करीन. नंतर मला जिंकून पुढें जा. अरे रामा, तुला वैष्णव अस्त्राचें माहात्म्य ठाऊक नाहीं काय? ह्याचें मी एक आख्यान सांगतों ऐक. ( २५१ ) हे रामा, पूर्वी एकदां शिवाचें सामर्थ्य अधिक होईल किंवा नारायणाचें बळ अधिक होईल, अशी चळवळ देवांमध्यें फार माजून राहिली होती, त्या समयीं ही हकीकत ब्रह्मदेवापुढें मांडावी, आणि ते काय निर्णय करितात तें आपण पाहूं असा देवांनीं बेत करून सर्वांनीं ब्रह्मदेवाजवळ जाऊन हा मागें सांगितलेला संशयग्रस्त [ संशयांत राहिलेला ] विषय त्याच्यापुढें ठेवला. नंतर ब्रह्मदेवानें मनांत विचार करून देवांच्या खात्रीकरितां शिवविष्णूमध्यें कांहीं कारणानें मुद्दाम विरोध आणिला, अर्थात मग त्या दोघांची लढाई उपस्थित झाली.

तदा नारायणमधिकं मेनिरे इति । ॥ २९२ ॥ तस्य स्वार्थेन तात्पर्यम् । तयोर्मध्ये शिवस्य बलोत्कर्षं नारायणमूर्तिरूपादस्त्राच्छिवदत्तस्य कस्यचिच्छूलस्योत्कर्षं च प्रतिपादयता श्रीरामचंद्रवचनेन बाधितत्वात् ॥ २९३ ॥ ननु कथाद्वयमपि रामायणगतं कुतस्तयोर्बलाबलविवेक इत्याशंक्याह ॥ २९४ ॥

---

तेव्हां विश्वकर्म्यानें उत्तम दोन धनुष्यें करून त्या दोघांना दिलीं होतीं. असो. त्या दोघांमध्यें लढाई चालतां चालतां नारायणानें शिवाला ह्या धनुष्यानें जिंकिलें. तेव्हांपासून सर्व देव नारायणास श्रेष्ठ मानूं लागले, यावरून शिवापेक्षां नारायण अधिक आहे, असें होत नाहीं काय? ( २९२ ) ह्या परशुरामाच्या बोलण्यावरून शिवापेक्षां नारायणाचें सामर्थ्य प्रथम दर्शनीं जास्त असल्यासारखें दिसतें खरें, परंतु त्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण रामानें [ राम हा विष्णूचा अवतार असतां त्यानें ] स्वतः शत्रुघ्नास लवणासुरास मारण्यास जाते वेळीं बजावून सांगितलें कीं, त्या लवणासुराच्या हातांत शिवांनीं दिलेला त्रिशूल असेल तेव्हां मीं दिलेल्या ह्या नारायणास्त्राचा तूं उपयोग करशील तर तुझें कार्य होणार नाहीं. कारण, शिवास्त्रापुढें ह्याचें कांहीं सामर्थ्य चालणार नाहीं. ह्यावरून विष्णूपेक्षां शिवाचें सामर्थ्य जास्त आहे हें उघड उघड सिद्ध झालें. [ अशी हीं कथा सांगून मध्यें थोडी शंका घेऊन रामायणांतील वाक्यांच्या प्रमाणांवरून स्वतःचें मत ग्रंथकार देतो. ] ( २९३ ) बरें, रामायणांत कवीनें परशुराम व राम यांची कथा सांगून त्या दोघांच्या बलाबलाची तुलना करण्याचें काय कारण होतें? अशी शंका येत असल्यास उत्तर देतो. ( २९४ ) हे शंकरा, संतापानें मदांध झालेल्या परशुरामाचें पहिलें वाक्य आपल्याला खरोखर निकृष्टत्व आणण्यासारखें आहे

"दृप्तस्य कोपकलुषस्य वचः किलाद्यं धर्मस्य विग्रहवतस्तु वचो द्वितीयम् । युद्धे क्वचित्त्वदधिकत्वमरेर्वचश्च त्वद्दत्तसत्यवरनिर्वहणाय युक्तम् ॥ २९५ ॥ काव्यवक्त्रैक्येन वक्तृगुणानुगुणबलाबलविभागमाश्रित्यावश्यसमाधेयविरोधसमाधानासंभवे कविनिबद्धवक्तृगुणदोषानुसारिणा बलाबलविभागेन वा स समाधातुमुचितः ॥ २९६ ॥ इह चाद्योपाख्यानस्य वक्ता भार्गवोतिदृप्तः प्रसिद्धस्तदानीं च क्रोधांध इति स्वस्य क्षत्रियवधाधादुपरतिं शस्त्रसन्यासं च परित्यज्य चपल इति विदितः द्वितीयोपाख्यानवक्ता श्रीरामचंद्रस्तु "धर्मो विग्रहवान्रामः"

---

खरें, परंतु धर्मशरीरी दाशरथिरामाच्या दुसऱ्या वाक्यानें तें पहिलें वाक्य बाधित [ खंडित ] झालें. आणि क्वचित लढाईच्या प्रसंगविशेषीं आपल्यापेक्षां अमुक एक मनुष्य अधिक आहे, असें तुमच्या शत्रूचें वाक्य असलें ह्मणून त्यांत नवल नाहीं. कारण आपण दिलेला वर खरा करून दाखविण्याकरितां तशा काहीं गोष्टी मुद्दाम करवाव्या लागतात. ( २९५ ) काव्य रचणारा एकच असल्यामुळें आपल्या काव्यांतल्या पात्रांचें बलाबल आणि गुणावगुण हें सांगितल्यावांचून आणि त्यांचें बलाबळ सांगून विरोध आला असतां काव्यांतल्या कोणत्या पात्राचें भाषण सयुक्तिक आहे, कोणत्या पात्राचें विरोधपर आहे, हें दाखविल्यावांचून विरोधिपक्षाचें समाधान करितां यावयाचें नाहीं; ह्मणून कवीनें आपल्या निबंधांत ह्या दोन कथा सांगितल्या त्या बरोबर आहेत. ( २९६ ) या दोन कथाभागांत सांगितलेल्या दोन पात्रांपैकीं पहिलें आख्यान सांगणारा परशुराम हा संतापानें लाल झाला होता, आणि क्षत्रियांना मार मारून उपरत [ विरक्त ] झाला होता, व त्यानें शस्त्र धरणें सोडलें होते असें वर्णन आहे, यावरून परशुरामाचें भाषण

इत्यादिकविवचनैः । " विद्धि मामृषिभिस्तुल्यं केवलं धर्ममाश्रितम् " इत्यादि स्ववचनैश्च " रामो द्विर्नाभिभाषते " इत्यादिवचनैः स्ववचनस्य सूनृततया च धर्मैकनिरतः सत्यसंध इति प्रसिद्धः अतस्तद्वचनेन तद्विरोधिनो भार्गवस्य वचनस्य बाधनं युक्तं ॥ २५७ ॥ " एतेन ब्रह्मा स्वयंभूश्चतुराननो वा रुद्रस्त्रिनेत्रस्त्रिपुरांतको वा । इंद्रो महेंद्रः सुरनायको वा त्रातुं न शक्ता युधि रामवध्यम् " ॥ २५८ ॥ इति रावणं प्रति हनुमद्वचनमपि व्याख्यातं । तदपि हि रावणभयोत्पादनार्थत्वेनान्यथासिद्धम् । वचनांतरविरुद्धं न स्वार्थं बोधयितुमीष्टे

---

रागाचें आणि चापल्याचें होतें, आणि दुसऱ्या पात्राचें अर्थात रामाचें भाषण धार्मिक आणि न्यायाचें होतें असें सिद्ध होतें. कारण " राम हा धार्मिक असून धर्मात्मा आहे, " अशा या कविवचनांनीं आणि " केवळ धर्माची बाजू उचललेल्या मला ऋषीप्रमाणें माना. " अशा या रामाच्या वचनानें तसेंच " राम हा दोन वेळां बोलत नाहीं. " अशा इतर वचनांनी राम हा खरें बोलणारा, न्यायी व सत्यप्रतिज्ञ होता असें ठरतें. मग अर्थात या रामाच्या बोलण्यावरून त्या चपल स्वभावाच्या द्वेषी परशुरामाचें बोलणें खोटें ठरलेंच पाहिजे. [ २५७ ] मारुतीनें रावणापुढें रामाची प्रशंसा जी केली, ती प्रशंसाही मागें आह्मीं वर्णन केल्याप्रमाणेंच होती, मारुतीनें रामाचें असें वर्णन केलें कीं, हे रावणा, राम लढाईत उभा राहून ज्याला मारण्याला प्रवृत्त होईल त्या प्राण्याचें रक्षण करण्यास चार तोंडाचा स्वयंभू ब्रह्मा, तीन डोळ्याचा त्रिपुरांतक ईश्वर, देवांचा नायक इंद्र, इत्यादि मोठमोठे योद्धेही असमर्थ आहेत, असें समज. ( २५८ ) अशा अर्थाचें वाक्य मारुतीनें रावणाला जें सांगितलें तें वाक्य रावणाला भय घालण्याकरितांच होतें, असें ह्मटलें पाहिजे, परंतु फक्त स्वार्थ

॥२५९॥ यथा " मत्तः प्रत्यवरः कश्चिन्नास्ति सुग्रीवसन्निधौ। अहं तावदिह प्राप्तः किंपुनस्ते महाबलाः। न हि प्रकृष्टाः प्रेष्यंते प्रेष्यंते हीतरे जनाः "। इति सीतां प्रति हनुमतो वचनं सीताश्वासनार्थत्वेनान्यथा सिद्धम् ॥२६०॥ एतादृशान्यथासिद्धिरहितं तु " एतदस्त्रबलं दिव्यं मम वा त्र्यंबकस्य वा " इति श्रीरामचंद्रवचनं शिवस्य तदपेक्षया बलोत्कर्षं व्यनक्ति ॥२६१॥

---

साधण्याकरितां तो असें खोटें बोलला असें ह्मणूं नये. ( २५९ ) सीतेपुढें मारुतीनें आपली हकीकत सांगितली कीं, जानकी, सुग्रीवाजवळ माझ्यासारखा निर्बल कोणी दुसरा वानर नव्हता. आणि बलाढ्य वानराला कोणी अशा हलक्या सलक्या कामास पाठवीत नाहींत, ह्मणून तुझ्या शोधाकरितां माझीच त्यानें योजना केली. इतकें मारुतीनें आपलेकडे लघुत्व घेतलें. ह्मणून हें आत्मप्रशंसा नसलेलें वाक्य आणि " हें उत्तम अस्त्रबल माझें आहे किंवा त्र्यंबकाचें आहे " हें रामाचें वचन अशीं हीं दोन्हीं वचनें रामापेक्षां शिवाच्या उत्कर्षाला बळकटी आणणारीं आहेत, असें स्पष्ट सिद्ध होतें. ( २६० ) येथें जें शिवाचें वर्णन केलें, त्या विषयीं थोडें स्पष्ट करून दाखविणें अवश्य असल्यामुळें स्पष्ट करितात तें असें. " अस्त्रबल माझें किंवा शिवाचें " अशा अर्थाच्या रामाच्या वाक्यांत दीपिकालंकार जो दिसत आहे, त्या अलंकाराच्या दृष्टीनें पाहतां शिवाला उपमानत्व दिलें आहे, आणि रामाला उपमेयत्व दिलें आहे. तर उपमेय वस्तूपेक्षां उपमान वस्तु कांहीं गुणांनीं अधिक असते, असें अलंकारिक सर्व कवि कबूल करतात. आणि स्वतःच्या कंठरवानें " मुखचंद्रम् " या ठिकाणीं उपमानरूप चंद्रापेक्षां उपमेयरूप मुखामध्यें कांहीं तेजःपुंजत्व शीतलत्व इत्यादि गुण नाहींत, याकरितां " उपमेयादधिकगुणमुपमानम् " असें स्पष्ट ह्मटलें आहे. या प्रमाणावरून मागें जो बाध्य बाधकभाव

अत्र हि शिववर्णनं दीपकालंकारद्योत्यायामुपमायां शिवस्यो-पमानत्वसिध्यर्थं उपमेयादधिकगुणमेवोपमानं भवतीति कवि-समयः " मुखचंद्रादौ " स प्रसिद्धः । एवं प्रमाणबलाबल-पर्यालोचनया बाध्यबाधकभाव उक्तः ॥ २६२ ॥ अथ प्रमेय-पर्यालोचनया भार्गववर्णितोपाख्यानस्यान्यथासिद्धिरुच्यते । " शिवो नारायणेन निर्जितः " इति खल्वस्मिन्नुपाख्याने व-र्णितं । सोयमर्थः शिवेन कदाचिन्नारायणाय स्वदत्तं वरं प-रिपालयितुमभिनीतः स्वस्य पराजयः कथं? ॥२६३ ॥ भार-ते हि द्रोणपर्वणि द्रोणवधानंतरमतिकुपितेनाश्वत्थाम्ना अर्जुनं प्रति स्वप्रहितं नारायणास्त्रं भगवता कृष्णेन वितथीकृतमा-लक्ष्य व्रीडितेन धिग्धिगिति शस्त्रं परित्यज्य दक्षिणां दिशं प्रति प्रस्थितेन मध्ये मार्गे मिलिताद्वेदव्यासादाकर्णितं यदु-

---

दाखविला तो बरोबर आहे. त्यावरून अर्थात शिव हा स-र्वांपेक्षां श्रेष्ठ आहे, असें सिद्ध झालें ( २६२ ) आतां प्रमे-यावरून पाहतां [ कथाभागावरून पाहतां ] भार्गवरामानेंच काय तें त्या वैष्णवअस्त्राचें वर्णन केलें, तें ही योग्य वर्णन केलें नाहीं असें दाखवितात. नारायणानें शिवाला जिंकलें ह्मणून वर्णन केलें आहे यांत काय विशेष झालें? तुझ्याकडून मी पराभव पावतों, असा शिवानें नारायणाला कदाचित् वर दिला असेल, तो वर पाळण्याकरितां शिवानें तसें केलें ह्मणून शिवमहत्व कमी झालें कीं काय? ( २६३ ) महाभारतांत द्रोणपर्वांत द्रोणाच्या मर-णानंतर अतिशय संतापलेल्या अश्वत्थाम्यानें अर्जुनावर सोडलेल्या नारायणास्त्राला श्रीकृष्ण भगवानांनीं व्यर्थ केलें, तें पाहून ह्या अ-स्त्रास धिक्कार असो असें ह्मणून व आपल्या हातांतील शस्त्र टा-कून देऊन त्यानें दक्षिणेकडे पळ काढिला, तेव्हां त्या अश्वत्था-

पाख्यानं ॥२६४॥ पुरा नारायणाय षष्ठिं वर्षसहस्राणि मैनाके महता तपसा शिवमाराधितवते शिवेन बलवीर्यपराक्रमादिकं सर्वत्राप्रतिहतं दत्तमिति ॥ २६५॥ तत्रेदं वरांतरमपि शिवेन तस्मै दत्तमिति वर्णितम् “ अपि चेत्समरं प्राप्य भविष्यसि ममाधिकः ” इति । हरिवंशे च ॥ २६६ ॥ पारिजातहरणसिध्यर्थं शिवमाराध्य स्तुवते कृष्णाय अयमेव पुरा दत्तो वरः स्मारितः इति वर्णितम् । “ इति संस्तूयमानस्तु भगवान् गोवृषध्वजः । प्रसार्य दक्षिणं हस्तं वासुदेवमथाब्रवीत् । मनीषितानामर्थानां प्राप्तिस्तेऽस्तु सुरोत्तम ॥ २६७ ॥

---

म्याला रस्त्यामध्यें वेदव्यासमहर्षीनें गांठून सांगितलें कीं, या अश्वत्थामन् तुला एक पूर्वींचा इतिहास सांगतों ऐक. ( २६४ ) पूर्वीं नारायणानें शिवाला प्रसन्न करून घेण्याकरितां मैनाकपर्वतावर साठ हजार वर्षेंपर्यंत तप केलें, तेव्हां शिव प्रसन्न होऊन नारायणाला शिवानें वर दिला कीं, नारायणा, तुझ्यासारखा बलाढ्य पराक्रमी व वीर्यवान् जगांत दुसरा कोणी होणार नाहीं, आणि सर्वत्र तुझी गती अप्रतिहत होईल. ( २६५ ) दुसऱ्या वेळेस पुनः एकदां वर दिला आहे त्यांत असें वर्णन आहे कीं, नारायणा, तूं युद्धाला जेव्हां येशील, तेव्हां माझ्यापेक्षां तूं पराक्रमानें अधिक होशील, या शिवाय हरिवंशांत वर्णन केलें आहे, तेथेंही अशा अर्थाचाच वर दिला आहे ह्मणून वर्णन आहे. ( २६६ ) पारिजात हरणाच्या सिद्धीकरितां शिवाची आराधना व स्तुति जेव्हां कृष्णानें केली, तेव्हांही असाच शिवानें कृष्णास वर दिला ह्मणून वर्णन केलें आहे, तें असें — अनेक तऱ्हेनें शिवाची स्तुति केल्यानंतर भगवान् वृषध्वजानें उजवा हात पुढें करून वासुदेवाला ह्मटलें, हे वासुदेवा, तुझे मनोरथ सगळे पूर्ण होतील, ( २६७ ) आणि पारिजाताचें हरण लौ-

पारिजातं तु हर्तासि माभूचे मनसो व्यथा। पुरा मैनाकमाश्रित्य तपस्त्वमकरोर्यदा ॥ २६८ ॥ तदा मम वचः कृष्ण संस्मृत्य स्थैर्यमाप्नुहि । अवध्यस्त्वमजेयस्त्वं मत्तः शूरतरस्तथा । भविता सीत्यवोचं यत्तत्तथा न तदन्यथा" इति ॥२६९॥ तस्मादन्यथासिद्धेरपि न तदुपाख्यानेऽभिनिवेशः कार्य इति । एवं श्रीरामायणे सर्वत्र शिवमाहिमख्यापनसत्वात् क्वचिद्विरोध्यभावाच्च शिवमहिमातिशय एव तस्य प्रधानप्रतिपाद्य इत्याह ॥ २७० ॥ " इत्थं तव श्रुतिशतप्रथितं परत्वं प्राधान्यतः स्मरहर प्रतिपादनीयम् । द्वारं तु रामचरितं कविना गृहीतं रामायणे महितमुत्तमकाव्यरत्ने " ॥ २७१ ॥ उत्तमकाव्यं हि

---

कर करशील जा. आतां मनांतली काळजी सोडून दे. कारण पूर्वी एकदां मैनाक पर्वतावर जेव्हां त्वां तपश्चर्या केली ( २६८ ) तेव्हां मीं ह्मटलेंच आहे कीं, तूं अवध्य, [ दुसऱ्या कडून वध करून घेण्यास अशक्य ] अजिंक्य व मोठा शूर होशील. मग तें माझें वचन कधींही वायां जाणार नाहीं. ( २६९ ) याप्रमाणें शिवानें जर पूर्वीं नारायणाला वर देऊन ठेविला आहे, तर परशुरामानें असें वर्णन केलेलें आख्यान यांत [ रामायणांत ] आणिलें ह्मणून कवीचा कांहीं दोष नाहीं. याप्रमाणेंच रामायणांत सर्वत्र शिवमहिम्याचें वर्णन असल्यामुळें कोठेंही विरोध येत नाहीं. आतां रामायणांत शिवमहिमाच मुख्यत्वें करून वर्णिला आहे, असें दाखवितात. ( २७० ) हे शिवा, हजारों श्रुतींत प्रख्यातीस आलेलें तुझें श्रेष्ठत्व मुख्यत्वें करून सांगण्याकरितां रामाचें चरित्र हें एक दार [ मुख्य भाग ] करून कवीनें आपल्या रत्नासारख्या काव्यांत जागोजाग तें वर्णन केलें आहे ( २७१ ) ह्मणून त्याला उत्तम काव्य असें ह्मणतात. उत्तम काव्याचें ल-

तदुच्यते यत्र ध्वन्यमानार्थप्रधानं तदभिव्यंजनसमर्थोत्तमना- यकचरितनिबंधनरूपं च। तदिह श्रीरामचंद्रं काव्यनायकं कृत्वा तच्चरितनिबंधनद्वारा शिवस्य परभावः कविना ध्वन्येन प्र- ख्यापित इत्यर्थः ॥ २७२ ॥ ननु "स तु मेधाविनौ दृष्ट्वा वे- देषु परिनिष्ठितौ। वेदोपबृंहणार्थाय तावग्राहयत प्रभुः।" इ- ति श्रीरामायणस्य वेदोपबृंहणत्वमुचितम्। तत्तु सिध्येद्यदि प्रधानप्रतिपाद्यत्वाभिमतस्य शिवपरभावस्य वेदप्रमितत्वं स्यात्। इत्याशंक्य विशेषितं ॥ २७३ ॥ श्रुतिशतप्रतिपन्नमिति स-

---

क्षण असें सांगितलें आहे कीं, ज्या काव्यांत ध्वन्यर्थ असून त्या अर्थाला बोध करून देण्याकरितां उत्तम नायकाची कल्पना केलेली असते, आणि नायकाच्या द्वारानें ध्वन्यर्थ निघत असेल तर तें उत्तम काव्य असें समजावें. आतां येथें 'शिवमहिमा' ह्याच ध्वन्यर्थ श्रीरामचंद्ररूपी उदात्त नायकाच्या मिषानें जागोजागीं कवीनें आपल्या काव्यांत आणल्यामुळें जगांत रामायणकाव्य श्रेष्ठ समजलें गेलें आहे. (२७२) येथें कोणी एक शंकाकार ह्म- णतो कीं, काय हो, उत्तम बुद्धिमान व वेदांत निष्णात अस- लेल्या रामलक्ष्मणांना पाहून वेदाचें पुष्टीकरण करण्याकरितां प्रभु शिवानें वाल्मीकी कडून रामायण निबंधांत त्या दोघा बंधूंना उ- दात्त नायकांच्या रूपानें आणविले आहेत असें जर मानिलें, तर वेदस्वरूप अशा रामायणांत वाल्मीकीनें मुख्यत्वेंकरून शिव- माहात्म्याचा आविर्भाव आणिला आहे. इतक्यावरून रामायणकाव्य वेदमय आहे असें मानितां येईल काय? आणि जेव्हां रामा- यण वेदमय आहे असें सिद्ध होईल, तेव्हां त्या काव्यांत मुख्य- त्वेंकरून आणिलेलें शिवमाहात्म्य वेदप्रसिद्ध असें मानितां येईल, तर ह्या गोष्टी सिद्ध करून दाखवा. शिवमाहात्म्याचें वर्णन केलें आहे त्यामुळें शिवमाहात्म्य जास्त श्रेष्ठ आहे असें ह्मणण्यास विशेष बळकटी आली. (२७३) हजारों श्रुतींत शिवमाहात्म्य

र्वमिदं ब्रह्मविष्णुरुद्रेंद्रास्ते संप्रसूयंते " सर्वाणि चेंद्रियाणि सह भूतैर्न कारणं कारणानां धाता ध्याता कारणं तु ध्येयः सर्वैश्वर्यसंपन्नः सर्वेश्वरः शंभुराकाशमध्ये क्षणमेकं तं लब्ध्वा क्रतुशतस्यापि चतुःसप्तत्या यत्फलं तदवाप्नोति " " शिव एको ध्येयः शिवंकरः " " सर्वमन्यत्परित्यज्य समाप्ताथर्वणी शिखा " । इत्यथर्वशिखोपनिषदि । " यस्मात्सर्वमिदं ब्र-

---

प्रसिद्ध आहे, रामायण काव्यही वेदमय आहे तेंच सांगतों ऐक. तें जग, तो ब्रह्मा, तो विष्णू तो रुद्र, तो इंद्र हे सर्व त्या शिवापासूनच झालेले आहेत. आतां याविषयीं वेदांतलीं वाक्यें सांगतों पहा! [ वरच्या श्रुतीचा व पौराणिक वचनांचा अर्थ तो असा? ] " ज्या पंचमहाभूतांसहित अकरा इंद्रियांची सृष्टि ज्यानें केली, त्या कारणरूपी पंचमहाभूतांना ब्रह्मा कांहीं कारण नव्हे, परंतु हा ब्रह्मा कारण कारणाचा ध्याता आहे. ह्मणजे ज्या सृष्टीला जे पंचमहाभूत कारण झाले आहेत, त्या पंचमहाभूतांच्या सृष्टीला जो कोणी एक " क्ष " कारण असेल, त्या " क्ष " चें हा ब्रह्मा निरंतर ध्यान करणारा आहे. असो, ज्या " क्ष " चें निरंतर हा ब्रह्मा ध्यान करितो, तो " क्ष " कोण आहे? असें जर विचारशील, तर तो सर्वैश्वर्यांनीं संपन्न असलेला सर्वांचा प्रभु शिव होय. आतां अशा शिवाला एक क्षणभर आपल्या हृदयाकाशामध्यें ध्यानरूपानें जो आणितो, त्या प्राण्याला त्या एका क्षणांत १७४ श्रेष्ठ श्रेष्ठ यज्ञ केल्याचें फळ मिळतें. " दुसऱ्या या श्रुतींत असें सांगितलें आहे कीं, " जगांत मंगलकर शिव हा एकच ध्यान करण्यास योग्य आहे. " तिसऱ्या श्रुतींतही सांगितलें आहे कीं, " इतर सर्व देवांना सोडून शिवाचेंच ध्यान करावें. असें सांगून मग अथर्वणश्रुती विराम पावली. " [ याप्रमाणें श्रुतींचा अर्थ झाला. आतां पुराणांत-

ह्मविष्णुरुद्रेंद्रपूर्वकम् । सह भूतेंद्रियैः सर्वैः प्रथमं संप्रसूयते ॥ १ ॥ कारणानां च यो धाता ध्याता परमकारणम् । न संप्रसूयतेऽन्यस्मात्कुतश्चन कदाचन ।२। स सर्वैश्वर्यसंपन्नो नाम्ना सर्वेश्वरः स्वयं। सर्वैर्मुमुक्षुभिर्ध्येयः शंभुराकाशमध्यगः ।३। सर्वमन्यत्परित्यज्य शिव एव शिवंकरः । परो ध्येयोऽथ देवेशः समाप्ताथर्वणी श्रुतिः ।४।" इत्यादि शिवपुराणोपबृंहितायामन्यासु चाथर्वशिरःश्वेताश्वतरकैवल्योपनिषदादिषु बहुपुराणवचनप्रपंचोपबृंहितासु प्रसिद्धः शिवस्य परभावः ॥ २७४॥ किंच श्रीरा-

---

ल्या श्लोकांचा अर्थ असा. ] ( १ ) ज्यापासून ब्रह्मा, विष्णु , रुद्र, इंद्र, आणि हें जग, पंचमहाभूतें, अकरा इंद्रियें इत्यादि वस्तु प्रथमच झाल्या आहेत, ( २ ) ज्या पंचमहाभूतांची ज्यानें सृष्टि केली, त्याचें संतत ध्यान ब्रह्मदेव करीत असतो. आणि ज्याचें ध्यान ब्रह्मदेव निरंतर करीत असतो, त्याला उत्पन्न करणारा जगांत कोणी नाहीं आणि त्याची उत्पत्ती जगांत कोणत्याही भागांत होत नाहीं. ( ३ ) असा तो ब्रह्मदेवाचा ध्येय ( ध्यान करण्यास योग्य ) सर्वैश्वर्यांनीं संपन्न असून सर्वांचा प्रभु आहे. मोक्षेच्छु प्राण्यांनीं आपल्या हृदयाकाशांत त्याचेंच ध्यान करावें. त्याच्या शिवाय ध्यानकरण्यास योग्य असा दुसरा कोणी नाहीं ( ४ ) अशा त्या प्रभूला शिव असें ह्मणतात. तो शिव परममंगलकर असून सर्व देवांचा स्वामी आहे. याकरितां दुसऱ्या सगळ्या देवांना सोडून शिवाचेंच ध्यान करावें असा बोध करून अथर्वण श्रुति विराम पावली. " याप्रमाणें शिवपुराणांत प्रसिद्ध असलेल्या श्रुतींत आणि अथर्वण वेद ज्यांत मुख्यत्वें करून आला आहे, अशा कैवल्योपनिषत् श्वेताश्वतरोपनिषत् या दोन उपनिषदामध्यें व आणखी दुसऱ्या पुष्कळ पुराणांमध्यें प्रसिद्ध झालेल्या श्रुतींत शिवमाहात्म्य प्रसिद्ध आहे. ( २७४ )

मायणं सावित्रीमंत्रगर्भं चतुर्विंशतौ सहस्रेषु सहस्रस्य सहस्र-स्यादौ क्रमनिवेशितसावित्रीवर्णचतुर्विंशतिकमिति ॥२७५॥ पूर्वपूर्वेभ्यो वच एतदूचुरित्यादिन्यायेन तदभियुक्तपरंपरासंप्रदायसिद्धं । तेन सावित्र्यर्थप्रधानं श्रीरामायणमिति ज्ञायते तदर्थः " सवितुर्वरेण्यः " शिव एवेति सवितृमंडलविद्यादिषु सुप्रसिद्धमेव ॥ २७६ ॥ श्रीरामायण एव चादित्यहृदये " सवितुर्वरेण्यः " त्रिमूर्त्युत्तीर्णः शिव एवेति भावितं ततोऽपि शिवमहिमप्रख्यापनपरतयैव श्रीरामायणस्य वेदोपबृंहणत्वं समर्थितमित्यलं पल्लवितेन ॥ २७७॥ केचित्तु वैष्णवाभिमानिनो

---

तसेंच रामायणांत सावित्री मंत्राचें प्रतिपादन केलें आहे. ह्मणजे चोवीसहजार रामायणांत प्रत्येक हजाराच्या आधीं सावित्री मंत्राचें एक एक अक्षर घातल्यामुळें चोवीस हजार प्रथांत मंत्राचीं चोवीस अक्षरें संपलीं. ( २७५ ) पूर्वीच्या लोकांनीं पूर्वीच्या लोकांना रामायण हें सावित्री मंत्रानें गर्भित आहे, असें सांगितलें. या न्यायानें पुढच्या अभियुक्त लोकांनीं पुढच्या अभियुक्त ( श्रेष्ठ ) पिढीला असेंच सांगितलें, अशा परंपरेनें रामायण हें मुख्यत्वें करून सावित्री मंत्राच्या अर्थानें परिपूर्ण आहे, असें स्पष्ट होतें; त्या सावित्री मंत्राचा अर्थ ह्मणजे " सवितुर्वरेण्यः ( सूर्यापेक्षां श्रेष्ठ ) " शिवच आहे असें " सवितृमंडलमध्यवर्ती " या विद्येमध्यें प्रसिद्ध आहे. ( २७६ ) श्रीरामायणांतल्या आदित्यहृदय मंत्रांत " सवितुर्वरेण्यः " या मंत्राचा अर्थ ब्रह्मा, विष्णु,रुद्र या तीन मूर्तींपेक्षां सूर्यांतर्गत शिव हा श्रेष्ठ आहे, असा केला आहे. । या वरून ही शिवमाहात्म्याची ख्याति रामायणांत केली आहे, असें सिद्ध झाल्यामुळें रामायण हें वेदपरिपूर्ण आहे असें अर्थात सिद्ध होतें. असो, हा विषय बराच लांबल्यामुळें आतां इतकेंच पुरे आहे. ( २७७ ) कांहीं वैष्णवाभिमानी लोक बोलतात कीं, भग-

वदंति भगवत्प्रपदनं भरन्यासविद्या सात्र सकृदनुष्ठिता स्वानुष्ठानदेहावसानं एवांतिमस्मृतिमप्यनपेक्ष्य मुक्तिप्रदा ॥२७८॥ तस्मादयमुपायांतरेभ्यः श्रेयान्मुक्त्युपायः। तदेवेह न्यासविद्यारूपं भगवत्प्रपदनं मुमुक्षोर्विभीषणस्य प्रपदनप्रपंचेनोपबृंहितम् तदेवास्य प्रधानं प्रतिपाद्यमिति। तन्मतं अनूद्य निरस्यति ॥ २७९ ॥ "केचिद्विभीषणसमाचारितं प्रधानं कोणे श्रुतं प्रपदनं प्रतिपाद्यमाहुः। प्राधान्यमत्र कथमुत्तमनाम्नि काव्ये

---

वंताला ( रामाला ) शरण जावें, संसाराचा त्याग करावा. अशा अर्थाची जी विद्या आहे तीच एकवार या रामायणांत सांगितली आहे. आणि ही विद्या ज्या देहाकडून स्वीकारिली जाते. त्या देहाच्या अवसानाच्या वेळेला [ मरणाच्या वेळेला ] मुख्यत्वेंकरून स्मरण करण्यास योग्य अशा भगवंताच्या नामाचें स्मरण सुद्धां करावयाला नको आहे. कारण मागें सांगितलेल्या विद्येपासूनच मुक्ति मिळते. ( २७८ ) यास्तव दुसरे हजार उपाय करण्यापेक्षां हा उपाय मुक्ति मिळण्यास श्रेष्ठ आहे. ह्मणूनच न्यासविद्यारूप भगवत्प्रपदन हें कृत्य [ संसाराचा त्याग करून भगवंताला शरण जावें. ] हेंच तत्व मोक्षेच्छु बिभीषणानें स्वीकारिलें आहे, तेंच रामायणांत मुख्यत्वेंकरून प्रतिपादन केलें आहे, शिवमाहात्म्य कांहीं मुख्यतः सांगितलें नाहीं, असें सिद्ध होतें. असें वैष्णवाभिमानी ह्मणत असतील, तर त्यांच्या [ वैष्णवांच्या ] मताचें प्रतिपादन करून सिद्धांतकार त्या मताचें असें खंडण करितात. ( २७९ ) कांहीं लोक [ वैष्णव ] कोठें एका कोपऱ्यांत वर्णन केलेल्या बिभीषणाचें चरित्र [ रामाला शरण गेलेलें ] घेऊन त्या चरित्राला मुख्यत्व आणितात, तर त्या चरित्राला मुख्यत्व कसें येईल बरें? ज्या उत्तम काव्यांत [ कोठें ध्वन्यर्थ निघत आहे, त्या काव्यांत ] ध्वन्यर्थ प्रतिपादन केलेलें चरित्र साद्यंत

वाच्यातिशायि विषयार्थि तदश्नुवीत ” ॥ २८०॥ त्रिविधं हि काव्यमुत्तममध्यमाधमभेदात्। यत्र वाच्यातिशायि व्यंग्यं तदुत्तमं यत्र व्यंग्यं वाच्यस्य गुणीभूतं तन्मध्यमं यत्र व्यंग्यमेव नास्ति तदधमं ॥२८१॥ काव्यस्य ह्यात्मा ध्वनिः शब्दार्थौ वपुस्थानीयाविति सहृदयानां मर्यादा । तत्र व्यंग्यरहितं काव्यं निरात्मकम् वपुर्मात्ररूपमित्यधमम् चार्वाकमतपक्षपातित्वात् ॥२८२॥ वस्तुतो गुणप्रधानभावार्हयोर्वाच्यव्यंग्ययोस्तद्वैपरीत्याद्गुणीभूत-

---

सांगितलें असूनही अतिशयानें [ स्पष्ट रीतीनें ] निघणाऱ्या वाच्यार्थरूपी विषयाला ग्रहण करणारें एखादें चरित्र कदाचित् सांगितलें असेल, तर त्या चरित्राला मुख्यत्व येईल काय? कारण, विद्वान् लोकांनीं ध्वन्यर्थ प्रतिपादन केलेल्या चरित्राला वाच्यार्थ प्रतिपादन् केलेल्या चरित्रापेक्षां महत्व जास्त दिलें आहे. (२८०) काव्यांत उत्तम, मध्यम, अधम असे तीन प्रकारचे भेद आहेत. ज्या काव्यांत वाच्यातिशायि व्यंग्य [ शब्दाच्या स्पष्टार्थापासून निघणारा ध्वनि ] आहे, त्या काव्याला उत्तम काव्य ह्मणतात. ज्या काव्यांत शब्दाच्या अर्थापासून लाक्षणिक रीतीनें ध्वनि निघतो त्याला मध्यम काव्य असें ह्मणतात. आणि ज्या काव्यांत ध्वनिच निघत नाहीं, त्याला अधम काव्य असें ह्मणतात. ( २८१ ) काव्य ही एक वस्तु प्राणी आहे असें रसिक लोक समजतात. तेव्हां या प्राण्याचा प्राण ध्वनि आहे, आणि शब्द अर्थ हे दोन त्या प्राण्याचा देह होय. या प्रमाणें रसिक लोकांनीं मानिलें आहे. तेव्हां ज्या काव्यांत ध्वनि नाहीं, तें काव्य निर्जीव आहे, असें समजलें जातें. ज्या काव्याला नुसतें शरीर आहे, तें अधम काव्य चार्वाकांनीं मात्र घेतलें आहे. ( २८२ ) वास्तविक विचार केला असतां अर्थांमध्यें गौणपणा असावा, आणि ध्वनीमध्यें मुख्यपणा असावा, हें चांगलें. आतां तसें नसून या-

व्यंग्यं मध्यमम् । ये वस्तुतो गुणप्रधानभूतयोर्देहात्मनोः कदाचिन्मम शरीरमित्यादि बुद्ध्या विविच्य जानंतोऽपि देहात्मभ्रमप्राचुर्येण देहप्रधाना लौकिकास्तदनुसारित्वात् ॥ २८३ ॥ तथाभूतमिदं व्यासप्रभृतीनां पुरस्ताद्गणनीयेन महाकविना भगवता प्राचेतसेन कृतं काव्यं न भवति । किंतूत्तमं काव्यमित्येव महनीयं सम्मतं च । सहृदयानां सर्वेषामपि तथैव अतोत्र ध्वनिप्राधान्यमपहाय वाच्यप्राधान्यमुच्यमानमुपहासायैव कल्प-

---

च्या उलट ह्मणजे ध्वनींत गौणपणा आणि अर्थांत मुख्यपणा असेल तर त्या काव्याला मध्यम काव्य असें ह्मणतात. वास्तविक देह हा गौण असून आत्मा हा प्रधान आहे. असें असतां उलट प्रयोग केला तर देह आणि आत्मा या विषयीं विवेचन [ विचार ] केल्याशिवाय समजणें शक्य नसल्यामुळें जाणते लोक विचार करून जरी देहात्म्याचा निश्चय करूं शकतील, तरी देहात्म्याचे ठिकाणीं पुष्कळ अंशीं भ्रम येण्याचा संभवच असतो, असें जर आहे, तर असला प्रयोग कां करावा? अशी शंका कोणी घेईल तर त्याला उत्तर देतात कीं, देहच प्रधान आहे, असें मानणारे प्राकृत लोक अशा प्रयोगालाच अनुसरत असल्यामुळें त्यांच्याकरितां मध्यम काव्याचा अंगिकार केला आहे. ( २८३ ) आतां व्यास वगैरे महाकवीमध्यें अग्रस्थान मिळविलेल्या भगवान् वाल्मीकीनें केलेलें रामायणकाव्य तशा प्रकारचें नाहीं. हें काव्य उत्तम आहे, असें मोठमोठे लोक ह्मणतात. आणि सर्व रसिक लोकांनीं हें काव्य उत्तम आहे, असेंच मत दिलें आहे. तेव्हां प्रधानभूत शिवमाहात्म्यरूप ध्वनीला प्राधान्य द्यावयाचें सोडून गुणीभूत विष्णुमाहात्म्यरूप वाच्याला प्राधान्य देणें ह्मणजे आपण होऊन जगांत थट्टा करून

त इति ॥ २८४॥ अथ काव्यमर्यादामपहाय फलगौरवेणास्य प्रपदनस्य प्राधान्यमुच्येत तदपि नास्तीत्याह ॥२८५॥ "स्याच्चेत्सदीश फलगौरवतः प्रधानमिक्ष्वाकुनायकसमाचरितं तथा स्यात्। तत्रापि वायसकृतं धनलाभतो पि दारात्मलाभमधिकं हि बुधा वदंति" ॥२८६॥ राज्ययोगेप्सया विभीषणेन प्रपदनं कृतम्। दारेप्सया श्रीरामचंद्रेण सुग्रीवप्रपदनं कृतम् "सुग्रीवं शरणं गतः" इति बहुधाम्रेडितत्वात् ॥ २८७ ॥ वायसेन तु तन्मुक्तास्त्रेणात्मनाशमाशंक्य तत्प्रतिष्ठानरूपलाभार्थं तस्यैव प्र-

घेण्यासारखें आहे. (२८४) तें असो. आतां येथें आह्मी [ वैष्णवाभिमानी ] अशी शंका घेतों कीं, काव्यमर्यादेला अनुसरून शिवमाहात्म्याला प्राधान्य येवो, परंतु फलगौरवानें [ सर्व सोडून शरण गेला ह्मणून] विभीषणचरित्राला प्राधान्य कां येऊं नये? अशी शंका घेतली तरी त्याला प्राधान्य येत नाहीं, असें सांगतात. (२८५) हे शंकरा, फलगौरवानें प्राधान्य मिळत असेल, तर मग रामाच्या शरण जाण्याला कां प्राधान्य देऊं नये? तसेंच जयंत काकाच्या शरण जाण्याला प्राधान्य कां देऊं नये? कारण विद्वान लोकांचें मन असें आहे कीं, धनलाभापेक्षां स्त्रीलाभ श्रेष्ठ आहे, आणि धनलाभापेक्षां आत्मलाभ ही श्रेष्ठ आहे. (२८६) तेव्हां विभीषण राज्य मिळविण्याकरितां रामास शरण गेला, आणि आपली बायको मिळावी ह्मणून रामानें सुग्रीवाशीं सख्य केलें. विभीषणाच्या कृत्यावद्दल जसें रामायणांतलें विभीषणाचें वाक्य दाखविलें, तसें "सुग्रीवं शरणं गतः" असें रामाचें वाक्य ही पुनः पुनः पुष्कळ ठिकाणीं रामायणांत आढळतें. (२८७) तसेंच रामानें जेव्हां जयंत काकावर अस्त्राचा प्रयोग केला, तेव्हां आ-

टीप—१. मुळांत प्रपदन असा शद्ब आहे, या शद्बाला बरोबर पर्यायार्थ न सांपडल्यामुळें कृत्य, आचरण, चरित्र अशा अर्थाचा उपयोग केला आहे.

पदनं कृतम् । तदपि " त्रीन् लोकान् संपरिक्रम्य तमेव शरणं गतः " इति कविना दर्शितम् ॥ २८८ ॥ तत्र धनदारात्मलाभफलानां प्रपदनानां मध्ये कस्य फलमधिकमिति त्वमेव विमृश " राजानं प्रथमं विंदेत्ततो भार्यां ततो धनम् " । इत्यात्मपरित्राणार्थं राजन्वती भूमिः प्रथममेष्टव्या तत्र गृहं कृत्वा वासार्थं भार्या समेष्टव्या ततस्तद्भरणार्थं धनमेष्टव्यमिति धनदारात्मनामुत्तरोत्तरस्य पूर्वपूर्वशेषीभावेन उत्कर्षो नीतिशास्त्रेष्वन्वयमुखेन दर्शितः ॥ २८९ ॥ " आपदर्थं धनं रक्षेद्दारान् रक्षेद्धनैरपि । आत्मानं सततं रक्षेद्दारैरपि धनैरपि " ।

---

पळे प्राण आतां राहत नाहींत, याकरितां त्रैलोक्यांत कोणाच्या तरी आश्रयास जावें, असा विचार करून त्यानें तिन्ही लोक हिंडून पाहिलें, पण त्याला कोणी पाठराखा मिळाला नाहीं. तेव्हां आपल्याला आतां कोणी वाली सांपडत नाहीं, असा विचार करून आत्मरक्षणाकरितां रामालाच तो शरण आला. अशा अर्थाचें " त्रिलोकान् संपरिक्रम्य तमेव शरणं गतः " हें वाक्य कवीनें दाखविलें आहे. (२८८) तेव्हां धन, दारा, शरीर या तीन लाभामध्यें कोणता लाभ श्रेष्ठ होईल, याचा विचार करून उत्तर दे पाहूं? असो मीच सांगतों. पहा, शाहण्या मनुष्यानें प्रथमतः स्वसंरक्षणाकरितां उत्तम राजा असलेली एखादी राजधानी पहावी, नंतर तेथें राहण्याकरितां एक घर बांधावें, मग लग्न करून घ्यावें, नंतर तिच्या रक्षणाकरितां पैसा मिळवावा, असें सिद्ध होतें. यावरून पुढें सांगितलेल्या कृत्याला पूर्वी सांगितलेल्या कृत्याचा अवशेष भाव नांवाचा संबंध येत असल्यामुळें अर्थात प्रथमतः सांगितलेल्या कृत्याला महत्व जास्त येत आहे, असें नीतिशास्त्रामध्यें अन्वयमुखानें दाखविलें आहे. (२८९) आतां आपल्याला संकटें येतील; ह्मणून धन राखावें, त्या धनानें कुटुं-

इति व्यतिरेकमुखेनाप्ययमर्थो दर्शितः । तस्मात्फलभूम्ना प्राधान्यं चेत् श्रीरामचंद्रकृतस्य वायसकृतस्यैव वा प्रपदनस्य प्राधान्यं प्रसज्येतेत्यर्थः ॥ २९० ॥ ननु विभीषणकृतं प्रपदनं मुक्त्यर्थमिति फलगौरवेण वाच्यस्यैव तस्य प्राधान्यमुक्तम् न काव्यमर्यादासिद्धं प्राधान्यमित्याशंक्याह ॥ २९१ ॥ " तच्चेद्विमुक्तिफलकं फलगौरवं स्याद्राज्येप्सयैव तु कृतं तदिति प्र-

---

वरक्षण करावें, स्त्री आणि धन या दोहोनें आपलें रक्षण करून घ्यावें. असें व्यतिरेकमुखानें उत्तरोत्तर कृत्याचा उत्कर्ष दाखविला. एकूण आत्मसंरक्षण करणें हें श्रेष्ठ आहे, असें सिद्ध झालें. मग राम बायको मिळविण्याकरितां सुग्रीवाला शरण गेला त्याला व जयंतकाक आत्मरक्षणाकरितां रामास शरण गेला त्याला, बिभीषणाच्या शरण जाण्यापेक्षां जास्त महत्व येतें. याकरितां फलगौरवानें बिभीषणाच्या शरण जाण्याला प्राधान्य येतें; असें जें ह्मणणें आहे, या ह्मणण्यांत कांहीं हंशील नाहीं. ( २९० ) तुह्माला माझ्या शंकेंतलें ह्द्गत समजलेंच नाहीं; माझा अभिप्राय असा आहे कीं, बिभीषण हा राज्य मिळविण्याकरितां रामाला शरण गेला नाहीं, मुक्ति मिळविण्याकारतां शरण गेला, असा जर अभिप्राय घेतला, तर फलगौरवानें वाच्याला [ अर्थाला ] प्राधान्य येतें तेंही काव्यमर्यादेला अनुसरून वाच्याला प्राधान्य सिद्ध करितां येत नाहीं. ( २९१ ) यालाही उत्तर देतों ऐक. मुक्तीच्या हेतूनें बिभीषण रामाला शरण गेला, असें असेल तर तूं ह्मटल्याप्रमाणें फलाला गौरव येत असल्यामुळें वाच्याला प्राधान्य येईल,

---

टीपः– १. व्यतिरेक, अन्वय, वाच्य, व्यंग्य ध्वनि इत्यादि शास्त्रीय पारिभाषिक शब्दांचीं व्याख्या अलंकारशास्त्रांत पहावी. जरूर तितकी व्याख्या केलीच आहे, विस्तारानें करणें ह्मणजे सांप्रतच्या विषयाला सोडून विषयांतर करावें लागत होतें ह्मणून तसें केलें नाहीं .

सिद्धम् । श्रीरामचंद्रपवनात्मजयोश्च सूक्त्या साक्षाच्च तस्य वचनेन विभीषणस्य ॥ २९२ ॥ न मुक्त्यर्थं विभीषणेन प्रपदनं कृतम् किंतु राज्यभोगार्थं तदेतत्पवनात्मजादिवचनैः स्पष्टम् । तत्र विभीषणागमनसमये पवनात्मजवचनं ॥ २९३ ॥ "उद्योगं तव संप्रेक्ष्य मिथ्यावृत्तं च रावणम् । "वालिनं च हतं श्रुत्वा सुग्रीवं चाभिषेचितम् । राज्यं प्रार्थयमानश्च बुद्धिपूर्वमिहागतः" इति ॥ २९४ ॥ तत्रैव सुग्रीवादीन् प्रति श्रीरामचंद्रवचनम् ॥ २९५ ॥ " न वयं तत्कुलीनाश्च राज्याकांक्षी च

---

परंतु तसें कोठें आहे? राज्य मिळविण्याकरितांच तो शरण गेला, असें तर रामायणांत स्पष्टपणें प्रसिद्ध आहे, आणि या विषयीं रामाचें, मारुतीचें व प्रत्यक्ष बिभीषणाचें वाक्यही प्रमाणभूत आहे. ( २९२ ) मुक्तीकरितां बिभीषण कांहीं रामाला शरण आला नाहीं, राज्योपभोग मिळावा, अशा हेतूनें आला. हें मारुति वगैरे मंडळींचीं वचनें आहेत त्यावरून स्पष्ट होतें. रामायणांत असा प्रसंग आणिला आहे कीं, बिभीषण समुद्र तरून इकडे येत होता, त्या वेळेस मारुती रामाला बोलतो, (२९३) हे रामा, आपला हा उद्योग पाहून व घरीं आपला वडील बंधु रावण हा वाईट चालीचा असल्यामुळें आपले सर्व उद्योग निष्फळ होतात, अशी स्थिति पाहून व वालीला मारून सुग्रीवाला आपण राज्य दिलें, अशी बातमी ऐकून ही संधी दवडूं न देतां आपलें कार्य साधावें, असा विचार करून आपणास राज्य मागण्याकरितां मुद्दाम हा येथें आला आहे. ( २९४ ) असें हें मारुतीचें भाषण झालें. आतां दुसरें त्याच वेळेस श्रीरामानें सुग्रीव वगैरे मंडळीला सांगितलें कीं, ( २९५ ) " वानरांनो, आपण कांहीं त्याच्या जातींतलें नाहीं आहोंत. हा राक्षस बिभीषण तर आह्मांकडे राज्य मागण्याकरितां आला आहे. अशा समयीं याला आह्मीं आश्रय द्यावा, अ-

राक्षसः । पंडिता हि भविष्यंति तस्माद्ग्राह्यो विभीषणः ” इति । तथा नागपाशबंधेऽपि श्रीरामचंद्रवचनम् ॥ २९६ ॥ “ यन्मया न कृतो राजा राक्षसानां विभीषणः । मिथ्याप्रलापिनं मां च प्रवक्ष्यंति न संशयः ” इति । तत्रैव शोकार्तस्य विभीषणस्य वचनम् ॥२९७॥ “ ययोर्वीर्यं समाश्रित्य प्रतिष्ठा कांक्षिता मया । तावुभौ देहनाशाय प्रसुप्तौ पुरुषर्षभौ ” इति । एतेन इयमपि शंका निरस्ता ॥ २९८ ॥ राज्यलाभांतरालिकं प्रयोजनं कृत्वा मोक्षार्थं विभीषणः प्रपन्न इति

---

सेंच थोरांचें मत पडणार, तेव्हां आपण या राक्षसाला आश्रय द्यावा, हें बरें दिसतें. ” हें एक झालें. पुनः दुसऱ्या वेळेस ह्मणजे रामलक्ष्मणांना नागपाशानें लढाईत इंद्रजितानें जखडून टाकिलें होतें, तेव्हां राम ह्मणतो. ( २९६ ) “ हाय हाय ” कशी वेळ आली पहा! आतां मला जगांत तोंड दाखविण्यास जागा राहिली नाहीं. कारण, विभीषणाला राज्यावर बसवितों, असें वचन दिलें होतें, पण या वेळेस तें खोटें ठरूं पाहत आहे, त्यामुळें सारें जग मला “ राम खोटा ” असें ह्मणेल ना? आतां यांत संशय कशाचा राहिला? हें रामाचें वाक्य झालें. त्याच वेळेला त्या दोघांची स्थिति पाहून आपण दुःखांत बुडून [ पीडित होऊन ] विभीषण बोलला कीं, (२९७) “ हर हर ” दैवा अखेरीस त्वां सुद्धां वेळ साधून घेतलीसना? ज्या रामलक्ष्मणांच्या पराक्रमावर भिस्त ठेऊन राज्य मिळविण्याची मीं हौस केली, ते रामलक्ष्मण आज मला एकट्याला येथें ठेऊन आपण मात्र देह टाकून परलोकाला जाण्याकरितां रणभूमीवर निजून धडपड करीत आहेत अरेरे! ” हें वाक्य विभीषणाचें झालें. यावरून मुक्तीकरितां बिभीषण शरण गेला, ही गोष्ट सिद्ध होत नाहीं. ( २९८ ) आणखी तूं ह्मणशील कीं, राज्याची मागणी ही

रामे विष्णुत्वबुद्धौ सत्यामेव मोक्षार्थं तत्प्रपदनमिति कल्प्ये तापि न तत्र सा बुद्धिस्तस्यास्ति तथा सति नागपाशबंधेन मूर्छितौ रामलक्ष्मणौ दृष्ट्वा एवं प्रलापानुपपत्तेः । न विष्णोरित्थमापत्कदाचिदपि प्रसज्यते । अभिनयमात्रमिदं किंचित्कालमित्याश्वासोपपत्तेः ॥ २९९ ॥ ननु विभीषणप्रपदनं मुक्त्यर्थं न भवति चेत् प्रपदनानंतरं । "परित्यक्ता मया लंका मित्राणि च धनानि च" इति वचनं न स्यात् । न ह्यमुमुक्षो-

---

उगीच मधल्यामध्यें होती, परंतु राम हा साक्षात् विष्णु आहे, असें समजून तो मुक्तीकरितां रामाला शरण गेला अशी कल्पना केली तरी, तसेंही संभवत नाहीं. कदाचित् राम हा विष्णु आहे, आणि अखेरीस तो आपल्यास मुक्ति देतो, अशी बुद्धि जर त्या बिभीषणाची असती, तर नागपाशाच्या बंधानें मूर्छा येऊन पडलेल्या रामलक्ष्मणांना पाहून दुःखानें तो रडला नसता, शिवाय विष्णु ह्मणविणाऱ्या रामाला असें संकटही आलें नसतें. कारण राम हा विष्णूच आहे, मनुष्यदेहाला अनुसरून कांहीं वेळ तसें करून दाखवितो, वस्तुतः त्याला मरण नाहीं असें समाधान करून घ्यावयाला त्यालेस बिभीषणाला जागा होती. (२९९) असो. आपल्याप्रमाणेंच कां होईना परंतु मी असें तुह्माला विचारतों कीं, मुक्ति मिळविण्याचा त्याचा हेतु नसून निव्वळ राज्यच मिळवावें असा जर त्या बिभीषणाचा हेतु असता तर त्यानें रामाला शरण गेल्यानंतर असें ह्मटलें कीं, "रामा, लंका सोडिली, स्नेही सोडले, द्रव्य टाकिलें, सर्व कांहीं सोडून तुला मी शरण आलों." मुक्ति मिळविण्याचा त्याचा जर हेतु नसता तर असें हें वैराग्याचें बोलणें तो कशाला बोलतां? शिवांय मोक्षेच्छु नसून अविरक्त मनुष्याला "मीं सर्व सोडलें" असें बोलणें संभवतें तरी कसें? याला उत्तर द्या पाहूं?

रविरक्तस्य सर्वत्यागवचनं संभाव्यत इत्याशंक्याह ॥ ३०० ॥ "लंकासुहृद्धनसुखानुभवादि सर्वं सक्तं मयेति तु वचो न ततो विरक्त्या । श्रीरामचंद्रकरुणार्द्रकटाक्षलब्धे तत्रैव रागपिशुनः खलु वाक्यशेषः ।१। "भवद्गतं मे राज्यं च जीवितं च सुखानि च" इति तदुत्तरार्धरूपो वाक्यशेषः ॥ ३०१ ॥ तत्रैव लंकाराज्यादौ रामचंद्रप्रसादलब्धे रागं व्यंजयति अतो लंकादेर्न स्वरूपतस्त्यागविषयं पूर्वार्धं। किंतु रामचंद्रप्रसादाल्लब्धं तन्मा भूदित्येतदभिप्रायं तेन लंकाधिपत्यादिकं त्वया मह्यं दातव्यमिति व्यज्यते ॥ ३०२ ॥ अत्रैव गमकत्वेन बिभीषणवचनानंतरं प्रवृत्तं

---

(३००) ऐक. लंका, मित्र, धन, सर्व सुख वगैरे सोडून मी तुझ्याकडे आलों, असें बिभीषणाचें हें अपुरें वाक्य वैराग्याचें मुळींच नव्हे. तर या बोलण्यानें रामाला करुणा यावी, आणि अशी ही आपली स्थिति पाहून रामाचे डोळे भरून यावे अर्थात आपल्यावर त्यानें कृपा करावी, मग तो प्रसन्न झाल्यानंतर "रामा, माझें राज्य, माझे स्नेही, माझें धन, माझें सुख हे सर्व आपल्यावर अवलंबून आहे," असें सांगून राहिलेलें वाक्य पूर्ण करून टाकावें. असा त्या भाषणांतला हेतु होता. (३०१) म्हणूनच रामाच्या अनुग्रहानें लंकेचें राज्य वगैरे मिळाल्यानंतर त्या विषयीं बिभीषणाचा अनुराग [ प्रीति ] कसा होता हें दाखवितात, "लंका वगैरे सोडून आलों" या वाक्यांत वास्तवीक सोडण्याचा त्याचा हेतु नसून आपल्यावर रामाची कृपा झाल्यावांचून राज्य मिळणार नाहीं, अशा अभिप्रायाचें तें वाक्य होतें. तेव्हां लंकेचें आधिपत्य वगैरे त्वां मला दिलें पाहिजे, असा त्या वाक्यांतून ध्वनि निघतो. (३०२) याच वाक्याच्या प्रमाणाकरिता बिभीषणाच्या भाषणानंतर झालेलें श्रीरामाचें कृत्य दाखवितात.

श्रीरामचंद्रव्यापारमुदाहरति ॥ ३०३ ॥ " ज्ञात्वा तदीप्सित-मितोऽथ रघुप्रवीरस्तेनैव रावणबलादि च वाचयित्वा । कृत्वा च रावणतदिष्टवधप्रतिज्ञां राज्याधिपत्यमददादभिषेकपूर्वम् " ॥ ३०४ ॥ श्रीरामचंद्रो विभीषणस्येदं वचनमाकर्ण्य तदभि-प्रायं बुध्वा तत्र क्रिया केवलमुत्तरमिति तदानीमेवाभिषेकपू-र्वकं लंकाराज्याधिपत्यं तस्मै ददौ । कथमिदानीमन्यदीयतया स्थितस्य राज्यस्य तस्मै दानमिति पश्यतामस्थाने व्यापारोऽयमिति शंकावारणार्थं । " अहत्वा रावणं संख्ये सपुत्रं सह बांधवम् । अयोध्यां न प्रवेक्ष्यामि त्रिभिस्तैर्भ्रातृभिः शपे " । इत्यभिषेकात्प्रागेव रावणतदीयपरिवारवधप्रतिज्ञा कृता.

---

( ३०३ ) नंतर रामानें बिभीषणाचें इद्गत [ मनांत असलेलें ] जाणून त्या बिभीषणाकडून रावणाचें सैन्य वगैरे कसें काय आहे? इत्यादि माहिती घेऊन मग रावणाला आणि त्याच्या आप्तांस मी मारतों, अशी प्रतिज्ञा करून तेथल्या तेथेंच रामानें त्या बिभी-षणाला राज्याभिषेक केला. ( ३०४ ) श्रीरामानें बिभीषणाचें वाक्य ऐकून त्याचें मन जाणून आतां याच्या वाक्याला आप-ली कृति [ करून दाखविणें ] हेंच उत्तर आहे, असें जाणून त्याला लंकेचें राज्य दिलें. येथें जरा शंका येण्याला अवकाश सांपडेल, ह्मणून रामानें पुढें सांगितल्याप्रमाणें केलें. ती शंका अशी कीं, दुसऱ्याच्या ताब्यांत असलेलें राज्य याला कसें दिलें, आणि तें देणेंही अस्थानीं व्यापार होतो, अशी शंका जाणून " बिभीषणा, लढाईत रावणाला त्याच्या मुलांसहित व बांधवां-सहित मारल्यावांचून अयोध्येच्या दारांत मी पाऊल टाकणार नाहीं, हें मी माझ्या तीन भावांची शपथ घेऊन सांगतों. " याप्रमाणें त्याला अभिषेक करण्यापूर्वींच रावण वगैरे लोकांना मारण्याची

॥ ३०५ ॥ प्रतिपक्षबलमज्ञात्वा हठात्क्रियमाणेयं प्रतिज्ञा-ध्यस्थान इति तेषामेव शंकावारणाय प्रतिज्ञायाः प्राग्विभीषणवचनश्रवणानंतरमेव । " आख्याहि मम तत्वेन राक्षसानां बलाबलं " इति विभीषणं प्रति पृष्ट्वा तन्मुखेन रावणस्य सर्वमपि बलं वाचितम् ॥ ३०६ ॥ आख्याहीत्यस्य प्रश्नस्य करिष्यमाणाभिषेकोपयोगाभिप्रायो न वर्ण्यते चेद्विभीषणेन यत्प्रार्थितं तत्रोत्तरं किमप्यनुक्त्वा रामेणान्यदेव पृष्टमिति वैयधिकरण्यं स्यात् तस्माद्विभीषणोक्त्यनंतरं श्रीरामचंद्रन्या-

---

रामानें प्रतिज्ञा केली. ( ३०५ ) आतां पुनः येथें शंका येते कीं, आपल्या शत्रूचें बळ कसें काय आहे, हें न समजून घेतां रामानें जी प्रतिज्ञा हट्टानें [ दुराग्रहानें ] केली, तो ही अस्थानींच व्यापार झाला. रामानें असें कसें केलें? अशी शंका येईल असें जाणून बिभीषणाचें भाषण संपल्याबरोबरच " विभीषणा, राक्षसांचें सामर्थ्य वगैरे कसें काय आहे तें सांग " याप्रमाणें बिभीषणाला प्रश्न करून त्याच्या तोंडानें रावणाचें बलाबल त्यानें सर्व ऐकून घेतलें. ( ३०६ ) रामानें बिभीषणाला रावणाचें बलाबल सांग, असा जो प्रश्न केला, त्यांतला अभिप्राय हाच आहे कीं, रावणाला मारून विभीषणाला राज्याभिषेक करावा, असेंच त्याच्या मनांत होतें. ह्मणूनच रावणाच्या बलाबलाचा विचार त्यानें केला. असें जर त्याच्या मनांत नसतें तर बिभीषणानें आल्याबरोबर रामाला काय प्रार्थना केली, आणि त्या प्रार्थनेला उत्तर न देतां रामानें दुसरेंच विचारिलें यावरून त्याच्या बोलण्यामध्यें मेळ नाहीं, ह्मणून त्या भाषणाला " वैयधिकरण्य दोष " [ असंबद्धपणाचा दोष ] येण्याचा संभव आहे, ह्मणून बिभीषणाचें भाषण संपल्याबरोबर रामानें त्याला विचारून पुढें जो निश्चय केला, त्याचा विचार के-

पारपर्यालोचनयापि विभीषणोक्तिः । केवलं रामचंद्रप्रसाद-लभ्यराज्यप्रार्थनार्थेति निश्चीयत इत्यर्थः ॥ ३०७ ॥ अतः केवलं राज्यप्रेप्सयैव रामचंद्रप्रपदनं । रामचंद्रस्यापि राज्यप्रदानमात्रविषया प्रतिज्ञा । अतएव नागपाशबद्धस्य रामस्य विभीषणाय प्रतिज्ञातराज्यं न दत्तमित्येवार्तवचनं रावणवधानंतरमभिषेकपूर्वकं विभीषणाय लंकाराज्यप्रदानेनैव रामस्य विभीषणविषये कृतकृत्यत्वबुद्ध्या प्रमोदो बालरामायणे कथितः ॥ ३०८ ॥ "अभिषिच्य च लंकायां राक्षसेंद्रं विभीषणम् । कृतकृत्यस्तदा रामो विज्वरः प्रमुमोद ह " इति ॥ ३०९ ॥ तस्माद्विभीषणप्रपदनस्य फलगौरवकृतं पारिभाषिकमपि प्रधान-

---

ला असतां, बिभीषणाचें बोलणें रामाला प्रसन्न करून राज्य मागण्यापुरतेंच होतें, असा खात्रीनें निश्चय होतो. ( ३०७ ) तेव्हां राज्य मागण्याकरितांच तो शरण गेला. रामानें सुद्धां राज्य देण्याकरितां प्रतिज्ञा केली, ह्मणूनच राम जेव्हां नागपाशानें बांधला गेला, तेव्हां बिभीषणाला राज्य देतों, असें वचन देऊन दिलें नाहीं, तर माझ्या आंगीं खोटेपणा येतो, आतां काय करूं? असें ह्मणून तो रडला. पुढें रावणाला मारल्यानंतर त्याला त्यानें राज्याभिषेक केला, तेव्हां रामानें बिभीषणाविषयीं कृतकृत्यबुद्धीनें [ करावयाचें तें केलें या बुद्धीनें ] आनंद दाखविला. ही कथा बालरामायणांत प्रसिद्ध आहे. ( ३०८ ) " लंकेच्या राज्यावर राक्षसश्रेष्ठ बिभीषणाला अभिषेक करून कृतकृत्य होऊन मनांतली काळजी दूर झाल्यामुळें त्यानें आनंद दाखविला. " ( ३०९ ) इतक्या सर्व कथाभागावरून बिभीषणाचें शरण जाणें राज्य मिळविण्यापुरतेंच होतें, असें सिद्ध झाल्यामुळें फलगौरवाकरितां त्याच्या कृत्याला प्रधानप्रतिपाद्यत्व [ मुख्य सांगण्याचा विषयपणा ] संभवत नाहीं. आतां पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रायशः रामायणांत

तिपाद्यत्वं न संभवतीति पूर्वोक्तरीत्या रामायणे प्रायः सर्वत्र ध्वन्यमानं शिवपारम्यमेव तस्य प्रधानप्रतिपाद्यमिति सिद्धम् ॥ ३१० ॥ यद्यपि ध्वन्यमानत्वाविशेषाद्रामायणे तत्र तत्र व्यंजितः शृंगारवीरकरुणाद्भुतरौद्रादिको रसो देवतागुरुनृपपितृपुत्रादिविषयरतिरूपो भावोऽपि प्राधान्यमर्हति तथापि रामायणे सर्वत्र प्रविततः शिवपारम्यरूपो वस्तुध्वनिः प्राधान्यमश्नुत इत्यत्र नास्ति विमत्यवकाशः ॥ ३११ ॥ अतो रामायणं शिवमहिमप्रख्यापनप्रधानं भवत्येवेति सिद्धम् । अथ स्तोत्रस्य प्रचयगमनार्थं समाप्तौ नमस्काररूपं मंगलं क्रियते

---

सर्व ठिकाणीं शिवमाहात्मच ध्वन्यर्थानें निघत आहे, तेव्हां रामायणांतला मुख्य सांगण्याचा अंश [ प्रधानप्रतिपाद्यत्व ] शिवमाहात्म्यच आहे असें सिद्ध झालें. ( ३१० ) आतां कोणी पुनः शंका घेतील, कीं, ध्वन्यर्थाला जर प्राधान्य देत असाल तर रामायणांत कांहीं कांहीं ठिकाणीं शृंगार, वीर, करुणा, अद्भुत, रौद्र इत्यादि रस ध्वनीनें निघतात, आणि देवता, गुरु, नृप [ राजा ] पिता, पुत्र इत्यादिकांविषयीं प्रेमभाव हा कांहीं कांहीं ठिकाणीं ध्वनीनें निघतो. तेव्हां यांना ही प्राधान्य येतें असें झालें. मग त्यांत शिवमाहात्म्यच प्रधानप्रतिपाद्यार्थ कां ह्मणावें? तर असें जरी आहे, तरी रामायणांत आरंभापासून अखेरपर्यंत ध्वन्यर्थानें निघणारें शिवमाहात्म्यच भरलेलें आहे. तेव्हां अर्थात यालाच प्राधान्य मिळालें पाहिजे. एकूण शिवमाहात्म्यच रामायणांतला मुख्यांश आहे, असें सिद्ध झालें. यावरून प्रतिवाद्याला नाहीं ह्मणण्यास कांहीं अवकाश राहिला नाहीं. ( ३११ ) आतां अखेरचा सिद्धांत हाच झाला कीं, शिवमाहात्म्यच यांतला मुख्यांश आहे दुसरा नाहीं. असो. आतां या सारसंग्रहस्तोत्राला प्रसिद्धि येतां समाप्तीच्या वेळेस नमस्काररूप मंगलाचरण करितों.

॥ ३१२ ॥ " प्राचेतसाय कवये प्रथमाय तस्मै तत्काव्यहार-तरलाय च राघवाय । विश्वात्मने तदुभयस्थिरभावलक्ष्यमुख्यास्पदाय विभवे च नमः शिवाय " ॥

इति श्रीमद्भारद्वाजकुलजलधिकौस्तुभश्रीमदद्वैतविद्याचार्यश्रीविश्वजिद्याजिश्रीरंगराजाध्वरिवरसूनोरप्पयदीक्षितस्य कृतिः श्रीरामायणसारसंग्रहस्तोत्रविवरणम् संपूर्णम् ॥

---

( ३१२ ) आदिकवि वाल्मीकीला माझा नमस्कार असो. त्या रामायण काव्यरूपी हाराच्या मध्यें पदकाप्रमाणें शोभणाऱ्या रामाला नमस्कार असो. वाल्मीकि आणि राम या दोघांच्या निश्चल दृष्टीला मुख्यत्वेंकरून आश्रय झालेल्या विश्वात्म्या [ जग ज्याचें शरीर आहे अशा ] प्रभु परशिवाला साष्टांग नमस्कार असो.

याप्रमाणें भारद्वाजकुलरूपी सागरांत उद्भवलेल्या, कौस्तुभ रत्नाप्रमाणें चमकणाऱ्या, श्रीमदद्वैतविद्येंत प्रवीण असणाऱ्या, " श्री विश्वजिद्याजि " असें उपपद मिळविलेल्या, श्रीरंगराजाध्वरिश्रेष्ठांचे पुत्र अप्पयदीक्षित नांवाचे पंडित त्यांनीं केलेला हा श्रीरामायणसारसंग्रहस्तोत्रविवरण नांवाचा ग्रंथ समाप्त झाला.

